


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष २० वे ] ऑक्टोबर १९६६ [ अंक १

अभिनिवेशरहित ऐतिहासिक व शास्त्रीय दृष्टिकोनातून–



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.











अनुक्रमणिका

वर्ष विसावे
अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोबर
१९६६

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ
प्रा. वि. म. वेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. वेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘ नवभारत ’ मासिक,
‘ गणेश भुवन ’ २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )
३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावचाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५

अनुक्रमणिका

प्र. रा. देशमुख

## अभिनिवेशरहित ऐतिहासिक व शास्त्रीय दृष्टिकोनातून–

# ऋचांच्या अभ्यासाची आवश्यकता

ऋचा हिंदूंचे प्रमाणग्रंथ समजल्या जातात त्यामुळे हिंदूंना त्यांचे धार्मिक महत्त्व अपरंपार आहे. हे महत्त्वाचे धार्मिक वाङ्मय जगविण्यासाठी प्राचीन ब्राह्मणांनी अपार कष्ट केले. पिढ्यान् पिढ्या ते मुखोद्गत करून जिवंत ठेवण्याचे कठीण काम प्राचीन ब्राह्मणांनी केले. वेदांचा अभ्यास हे ब्राह्मणांचे प्रथम विहित कर्म समजले जात होते. वेदाच्या अभ्यासास स्वाध्याय म्हणतात. स्वाध्याय ब्राह्मणांची धार्मिक श्रद्धेची बाब होती. स्वाध्यायामुळे आर्थिक फायदा होत नसला व जीवन कष्टाचे होत असले तरी ती धार्मिक श्रद्धेची बाब व स्मृतिनिर्दिष्ट कर्म असल्यामुळे पिढ्यान् पिढ्या चालू राहिली व हे प्राचीन वाङ्मय जिवंत राहिले. ब्राह्मणानी वेद मुखोद्गत करून जिवंत ठेवले असले तरी वेद अपौरुषेय असून त्यांचा अर्थ लावणे गौण आहे असा समज असल्यामुळे त्यांनी ऋचांचे अर्थ लावण्याचा अथवा त्यातील माहितीचा ऐहिक दृष्टीने उपयोग करण्याचा प्रयत्न केला नाही. त्यामुळे वेद बहुतांशी निरर्थक धार्मिक वाङ्मय म्हणूनच राहिले. वेदांचे अर्थ लावण्याचे काही तुरळक प्रयत्न झाले आहेत; परंतु ते फारच तोकडे आहेत. यास्काचा निघंटु हा असाच एक प्रयत्न आहे. काही थोडया ऋचातील शब्दांचे निरुक्त सांगितले आहे परंतु ऋचांचा सम्यक्तया अर्थ कळण्यास ते निरुपयोगी आहे. ऋग्वेदावरील सायण भाष्य मात्र ऋचांचा अर्थ कळण्यासाठी अत्यंत उपयुक्त आहे. सायणाच्या भाष्यामुळे संस्कृत जाणणाऱ्या सामान्य वाचकास ऋचा वाचण्याची सोय झाली आहे. सायण-भाष्यासह ऋग्वेदाची संशोधित प्रत व ऋग्वेदातील शब्दांची अनुक्रमणिका उपलब्ध करून देऊन पुण्याच्या वैदिक संशोधन मंडळाने ऋग्वेदाच्या अभ्यासकांची फार मोठी गरज भागविली आहे. असे अगदी तुरळक प्रयत्न झाले असले तरी ऋचांचा ऐहिक दृष्टीने व मूलगामी अभ्यास भारतात झाला नाही असेच म्हणावे लागेल.

ऋचांचे महत्त्व धार्मिक वाङ्मय म्हणून असले तरी जगातील प्राचीन व प्रचंड वाङ्मय म्हणूनही त्याचे महत्त्व फार आहे. ऋचा भारतातील लोकांसंबंधी फार प्राचीन माहिती देतात. ऋचा मूळच्या स्वरूपात कायम राखल्या गेल्यामुळे त्यांचे महत्त्व प्राचीन मौलिक वाङ्मय म्हणूनही फार आहे. ऋचांच्या अभ्यासामुळे प्राचीन भारतीय जीवन, इतिहास व प्राचीन चालीरीती व सांस्कृतिक जीवनावर प्रकाश पडून फार मोलाची माहिती मिळण्याची शक्यता आहे. परंतु त्यापूर्वी ऋचांचा सम्यक्तया शास्त्रीय दृष्टीकोनातून अभ्यास होऊन ऋचांचे प्रमाणित भाषांतर होण्याची फार जरूर आहे. आता पावेतो ऋचांचा ज्या दृष्टिकोनातून अभ्यास झाला तो चुकीचा असल्यामुळे ऋचांचे अर्थ लावण्याचे जे प्रयत्न झाले त्यातून समाधान मानण्यासारखे असे काहीच निष्पन्न झाले नाही.

प्राचीन परंपरागत ऋचांचे भारतीय भाष्यकार तसेच शास्त्रीय सूक्ष्मपद्धतीने (critical method) ऋचांचे अर्थ लावण्याचा दावा करणारे पाश्चात्य भाषांतरकार या दोघांनीही चुकीचा दृष्टिकोन अवलंबिल्यामुळे ऋचांचे आतापावेतो लावलेले अर्थ कसे चुकीचे झाले व त्याना ऋचातील वर्ण्य विषयाची स्थूल कल्पनाही कशी येऊ शकली नाही याचा येथे विचार करावयाचा आहे.



अनुक्रमणिका

## पाश्चात्यांचा अभ्यास

सोळाव्या शतकात व्यापाराच्या निमित्ताने भारतात आलेल्या पोर्तुगीज व्यापाऱ्यांच्या भारतीय भाषा व पोर्तुगीज भाषा यातील साम्य निदर्शनास आले. त्यांच्याकडून ते पाश्चात्य देशात कळल्यावर भारतीयांचे व त्यांचे समान भाषा बोलणारे कोणी सामान्य पूर्वज असावे अशी कल्पना निघाली. हे पूर्वज आर्य असल्यामुळे त्यांच्या संबंधी माहिती मिळविण्याचे प्रयत्न सुरू झाले. वेद हे आर्यांचे सर्वात प्राचीन वाङ्मय असल्यामुळे त्यात आर्यांसंबंधी माहिती मिळेल या हेतूने व आर्यांचे निवासस्थान कोणते, ते भारतात व युरोपात केव्हा गेले, इत्यादी आर्यासंबंधी व पर्यायाने स्वतःसंबंधी माहिती मिळविण्याच्या उद्देशाने पाश्चात्यांच्या वेदाच्या अभ्यासास सुरवात झाली.

भारतीय भाष्यकारांचे पारंपरिक पद्धतीने लावलेले वेदांचे अर्थ चुकीचे असतात म्हणून भारतीय भाष्य व पंडित यांची कोणत्याही प्रकारे मदत न घेता शब्दाच्या धात्वर्थावरून व वैदिक शब्दांची स्वतःच्या भाषेतील शब्दाशी व ग्रीक आणि लॅटीन भाषेतील धातूशी तुलना करून वेदाचे अर्थ लावण्याचे प्रयत्न काही पाश्चात्यांनी सुरू केले व वैदिक शब्दांचा कोश व व्याकरण करण्यात यशही मिळविले. त्यामुळे आपण शोधून काढलेली धात्वर्थावरून अर्थ लावण्याची पद्धती बरोबर आहे व त्यामुळे वेदातील शब्दांचे अर्थ बरोबर लागतात असा त्यांचा समज झाला. वेदाच्या अभ्यासास खरीखुरी सुरवात एकोणिसाव्या शतकाच्या मध्यात झाली. वर निर्देशिलेली सूक्ष्म पद्धती रॉथने प्राचुर्याने उपयोगात आणली.

## भारतीय विद्यापीठातील अभ्यास

संस्कृत भाषेचा भाग म्हणून ऋचांचा अभ्यास भारतीय विद्यापीठातही होतो. परंतु तो पाश्चात्यांनी केलेले ऋचांचे अर्थ लक्षात ठेवून परीक्षेच्या वेळी कसेबसे लिहून वेळ निभावून नेण्यापलीकडे नाही. दुर्दैवाने वेदाच्या अभ्यासासाठी भारतीय विद्यार्थ्यांना पाश्चात्यांनी लिहिलेल्या अतीतकाल झालेल्या चुकीच्या पुस्तकावर अवलंबून राहावे लागते. प्रथम ऋचांचा अर्थ बरोबर कळत नाही आणि थोडा बहुत कळला तरी आपल्या प्रचलित जीवनात त्याचा काय उपयोग आहे याची सामान्य विद्यार्थ्यास बिलकूल जाणीव नसल्यामुळे परीक्षा पास होण्यापेक्षा त्याला वेदाच्या अभ्यासात जास्त रस नसतो. भारतीय आणि जागतिक भाषा, प्राचीन भारतीय इतिहास, सामाजिक जीवन इत्यादींचे ऋग्वेद हे प्राचीन आणि महत्त्वाचे साधन आहे व त्या दृष्टीने ऋग्वेदाचा अभ्यास होणे जरूर आहे याची आम्हाला अद्यापि असावी तितकी जाणीव नाही. त्यामुळे ऋग्वेदाचा ज्या दृष्टीने अभ्यास व्हावयास पाहिजे तशा अभ्यासास अजून सुरवात झाली नाही.

## ऋचांचे स्वरूप

ऋचा आर्यांच्या देवांच्या स्तुती आहेत. त्यात इन्द्र, अग्नि, मरुत, वरुण, पूषन्, रुद्र, अश्विनौ, उषस्, द्यावापृथिवी, ब्रह्मणस्पति, विष्णू, त्वष्टा, विश्वरूप, अपांनपात, इळा, भारति, सरस्वति, वृषाकपी इत्यादि देवांच्या स्तुती आहेत. त्यात इन्द्र आणि अग्नीच्या स्तुती सर्वात जास्त आहेत.

ऋचा देवांच्या स्तुती असल्या तरी त्या सामान्य स्वरुपाच्या स्तुती नाहीत. त्यातून ऋचाकारांनी आपल्या पूर्वजांच्या विजिगिषेची वर्णने दिली आहेत. त्यानी केलेली विजिगिषेची कृत्ये त्यांच्यासाठी ऋचातील स्तुत्य देवांनी केली अशी ऋचातून वर्णने आहेत. त्यामुळे ऋचा जरी देवांच्या स्तुती असल्या तरी त्यातून पूर्व-आर्यांच्या विजिगिषेचीच वर्णने प्रामुख्याने आहेत. त्यात त्यानी केलेली युद्धे, गायी, अन्न, धन, सोने व मौल्यवान दगड, शेतातील पिके, शेते आणि जलाशये, स्त्रिया आणि मुले काबीज करण्यासाठी केलेले संग्राम यांचीच वर्णने प्रामुख्याने आहेत. तसेच पूर्व आर्यांनी फोडलेल्या त्यांच्या तटबंदीच्या व सभोवती खंदक व दरवाजे असलेल्या शहरांची वर्णने, अग्नीचा उपयोग व त्यानी आपल्या दास दस्यु, पणी इत्यादी नावाने संबोधिलेल्या शत्रूंच्या केलेल्या कत्तलीची वर्णने आली आहेत. ऋचातून आर्यांच्या नऊ दहा पिढ्यांचा म्हणजे अंदाजे तीन शतकांचा क्रमवारीने इतिहास आला आहे. ऋचा देवांच्या स्तुती असल्या तरी त्यातून पूर्व आर्यांचा इतिहासच प्रामुख्याने आला आहे. ऋचातून इतिहास







कसा पाहावा ते इतरत्र[१] विस्ताराने लिहिले आहे. येथे त्याचे थोडेसे दिग्दर्शन केले आहे. ऋचा १-१३०-७ अशी–

भिनत्पुरो नवतिमिन्द्र पूरवे दिवोदासाय
महि दाशुषे नृतो वज्रेण दाशुषे नृतो ।
अतिथिग्वाय शम्बरं गिरेरुग्रो अवाभरत् ।
महो धनानि दयमान ओजसा विश्वा
धनान्योजसा ॥

"हे इन्द्रा (रणात) थैमान करून हविर्दान करणाऱ्या श्रेष्ठ दिवोदासासाठी वज्राने नव्वद शहरे फोडलीस, उग्र इन्द्राने अतिथिग्वासाठी शम्बराला पर्वताखाली फेकून देऊन तेजाने मोठे धन दिले. तेजाने सर्व धन दिले."

ही ऋचा इन्द्राच्या स्तुतिपर आहे. तीत इन्द्राने शम्बराची नव्वद शहरे फोडली, शम्बराला पर्वताच्या खाली फेकून दिले व तेजाने (अग्नीच्या साह्याने) त्याचे सर्व धन अतिथिग्वास दिले अशी इन्द्राची स्तुती आहे. हे सर्व पराक्रम इन्द्राने अतिथिग्व दिवोदासासाठी केले असेही वर्णन वरील ऋचेत आहे. याचा अर्थ असा की, वास्तविक हे सर्व पराक्रम अतिथिग्व दिवोदासानेच केले परंतु त्याच्यासाठी ते इन्द्राने केले असे ऋचातून वर्णन आहे. वरील ऋचेवरून प्रामुख्याने दोन गोष्टी निदर्शनास येतील. पहिली ही की वरील ऋचा जरी इन्द्राच्या स्तुतिपर असली तरी वास्तविक तीत अतिथिग्व दिवोदासाने केलेल्या पराक्रमाचेच वर्णन आहे. वरील ऋचेवरून दिवोदासाने शम्बराची नव्वद शहरे फोडली, त्याला तटबंदीवरून फेकून दिले व त्याची शहरे पेटवून देऊन त्याचे सर्व धन लुटले अशी अतिथिग्व दिवोदासाबद्दल ऐतिहासिक माहिती मिळते. दुसरी महत्त्वाची गोष्ट ही कळते की वास्तविक हे सर्व पराक्रम अतिथिग्व दिवोदासाने केले असले तरी ते त्याच्यासाठी ऋचेतील स्तुत्य देव म्हणजे इन्द्राने केले आहे असे वर्णन आहे हे ऋचातील देवाच्या स्तुतीचे तन्त्र आहे व ते ऋचातून सर्वत्र अवलंबिले आहे. वरील ऋचेवरून ऋचांचे ऐतिहासिक स्वरूप स्पष्ट होईल. तसेच ऋचातील देवाच्या स्तुतीत कोणते तन्त्र अवलंबिले आहे तेही कळेल. असे ऋचा पूर्वआर्यांच्या इतिहासाचे महत्वाचे साधन आहे. त्यात त्याचे संग्राम तटबंदीच्या शहरात राहणाऱ्या व्यापार करणाऱ्या दास, दस्यु आणि पणी नावाच्या लोकाशी झाले असल्याचे वर्णन आहे. हे लोक समृद्ध व्यापारी असून त्यांचा समुद्रावर व्यापार चाले. ते सभोवार खंदक असलेल्या, दरवाजे असलेल्या तटबंदीच्या शहरात राहत होते. त्यांच्याजवळ, सोने रुपे, मौल्यवान दगड, धान्य, गायी, घोडे इत्यादि पशुधन, सुपीक शेते व जलाशये होती. ते लिंगपूजक व मूर्तीपूजक होते. विश्वरूप नावाचा त्यांचा तीन तोंडाचा देव होता. त्यांच्या देवांच्या व श्रेष्ठ पुरुषांच्या डोक्यावर शिंगे बांधण्याची पद्धती होती. ते नागाशी सादृश्य दाखविण्यासाठी जिभेला चिरा देत. ते नागाशी संबंधित होते. आर्य त्याना अही, दास, दस्यु ह्या नागनिदर्शक नावांनी संबोधीत. अशी ऋचातून पूर्वआर्यांबद्दल व त्यांच्या तटबंदीच्या शहरात राहणाऱ्या शत्रूबद्दल फार महत्वाची ऐतिहासिक माहिती मिळते.

आर्यांच्या शत्रूबद्दल ऋचातून मिळणाऱ्या माहितीची सिंधुउत्खननातून उपलब्ध झालेल्या माहितीशी तुलना करून ऋचातून वर्णन असलेल्या आर्यांच्या शत्रूंचे सिंधुसंस्कृतीतील लोकांशी साम्य दाखविता येते. सिंधुउत्खननात उपलब्ध झालेली तटबंदीच्या शहरांची संस्कृतीच ऋचात वर्णन असलेल्या आर्यांच्या शत्रूची संस्कृती होय हे दाखविता आल्यास सिंधु-उत्खननातील माहिती ऋग्वेदास जोडली जाते व ऋचातील वर्णनाची सत्यासत्यता पाहण्यास साधन निर्माण होते. ऋचातील माहितीची सिंधुउत्खननात उपलब्ध झालेल्या पुराव्याशी तुलना करून ऋचात वर्णन असलेले आर्यांचे शत्रू व सिंधुसंस्कृतीतील लोकांचे ऐकात्म्य इतरत्र[१] दाखविले आहे.

ऋचातील व सिंधुसंस्कृतीतील माहितीवरून ऋचातील वर्णने पूर्व–आर्यांचा इतिहास आहे ही गोष्ट निश्चितपणे दिसते. ऋचातील वर्णने इतकी उघड असताना त्याबद्दल इतका गैरसमज व इतक्या

१. Indus civilisation in The Rgveda आणि सिंधुसंस्कृती, ऋग्वेद व हिंदुसंस्कृती या पुस्तकात.



अनुक्रमणिका

परस्परविरोधी कल्पना का असाव्या हा प्रश्न आहे. भाषेचा दुर्बोधपणा काही अंशी कारण असेल परंतु वरील दृष्टिकोनातून ऋचांकडे पाहिले म्हणजे शब्दांचे अर्थ बरोबर आणि सुलभतेने लागतात. ऋचांची भाषा अगदी सुलभ आणि सरळ आहे असे दिसेल. खरी अडचण भाषेची नसून ऋचांकडे पाहण्याच्या दृष्टिकोनाची आहे. ऋचांकडे पाहण्याच्या चुकीच्या दृष्टिकोनामुळेच आतापावेतो ऋचांचे अर्थ चुकीचे झाले. ऋचातून न निघणारे चुकीचे अर्थ काढण्याचा प्रयत्न केल्यामुळे ऋचा दुर्बोध आणि अर्थशून्य वाटू लागल्या. यास्कापासून आधुनिक पाश्चात्य लेखकापावेतो चुकीचा दृष्टिकोन अवलंबिल्यामुळे ऋचांचे अर्थ कसे चुकले व ऋचातील माहितीबद्दल त्याना स्थूल स्वरूपाचीही कल्पना कशी येऊ शकली नाही हे येथे पाहू.

## निसर्गपर अर्थ लावणारांचा वर्ग

यास्काने (इ. स. पूर्व ५००) अंदाजे ६०० ऋचांवर टीका लिहिली आहे. यास्कापूर्वीही ऋचांचे अर्थ लावण्याचे प्रयत्न झाले असे त्याच्या निघण्टुवरून दिसते, परंतु ते उपलब्ध नाही. यास्क निरुक्तात शब्दाचे सर्व अर्थ देतो व ऋचेच्या संदर्भात अमुकच विवक्षित अर्थ घेण्याचा आग्रह धरीत नसला तरी त्याने घेतलेल्या बहुसंख्य अर्थावरून तो ऋचांचे निसर्गपर अर्थ लावण्याच्या मताचा होता असे दिसते सायणाने आपल्या भाष्यात यास्काचे निरुक्त ज्या ऋचावर आहे त्या ऋचावरील भाष्यात ते उद्धृत केले आहे. यास्काचा प्रभाव सायणावरच नव्हे तर पाश्चात्य विद्वानांवरही पडला आहे. ऋचात देवांचे जे पराक्रम वर्णिले आहेत, ते निसर्गातील दृश्यांची वर्णने आहेत असे मानणारा भारतात आणि भारताबाहेर फार मोठा वर्ग आहे. तसे मानण्यास प्रवृत्त करण्यास ऋचाच काहीशा कारणीभूत आहेत. उदाहरणार्थ आपण वर उद्धृत केलेल्या १-१३०-७ या ऋचेत शम्बराची नव्वद शहरे इन्द्राने फोडली असे वर्णन आहे. इन्द्र हा देव आहे. तेव्हा त्याने फोडलेली शहरेही त्याने फोडण्याच्या योग्यतेची तशीच काहीतरी असली पाहिजेत. आणि त्यांचा स्वामी शम्बरही कोणीतरी श्रेष्ठ बलवान अतिमानव असला पाहिजे. ही विचारपरंपरा ओघानेच येते. आणि ऋग्वेदातील शहरे, तटबंदी, शहराचे स्वामी, त्यांचे द्रव्य, सोने गायी, घोडे, पशुधन, शेते, जलाशये, स्त्रिया व मुले सर्वच अतिमानव व काल्पनिक होतात. एकदा ही विचारसरणी अंगिकारिली म्हणजे कुत्स, आयु, आणि अतिथिग्व दिवोदासाने एकत्र होऊन सुश्रवसावर चढाई करण्यासारख्या, अथवा दाशराज्ञ युद्धासारख्या महत्त्वाच्या ऐतिहासिक घटनाही निरर्थक होऊन अवलक्षिल्या जातात. एकदा ऋचात देवांचे पराक्रम वर्णिले आहेत असा समज झाल्यावर मग सर्व ऋग्वेदच अतिमानुष आणि दैवी होतो. त्यातील सगळ्या घटना देवांचे पराक्रम होतात. ऋचातील इन्द्र अग्नि आदि देव निसर्गातील शक्तींची प्रतीके असल्यामुळे त्यांचे पराक्रमही निसर्गात घडणाऱ्या कांही गोष्टींची प्रतीके असावी हेही मानणे ओघानेच येते त्यामुळे ऋचांचे स्वरूप संपूर्ण बदलून जाते. या दृष्टिकोनातून ऋचांकडे पाहण्यास सुरवात यास्कापासून झाली ती आजपावेतो कायम आहे. त्यात वेदाच्या पाश्चात्य अभ्यासकांचाही प्राचुर्याने समावेश आहे. ज्या मॅकडोनेलची पुस्तके भारतीय विश्वविद्यालयात पाठ्यपुस्तके आहेत त्याचाही ऋचांकडे पाहण्याचा हाच दृष्टिकोन. या दृष्टिकोनामुळे ऋचांचे अर्थ विकृत आणि चुकीचे झाले आहेत.

भाषेवर कितीही कसरत केली आणि शब्द शोधून काढले तरी जोपर्यंत ऋचात काय सांगितले याची नीटशी कल्पना येत नाही आणि त्यात देवांचे अतिमानुष पराक्रम आणि निसर्गात घडणाऱ्या गोष्टींची वर्णने आहेत असा चुकीचा समज आहे तो पावतो धात्वर्थावरून अर्थ लावण्याची रॉथची क्रिटिकल मेथड असो अथवा ज्याबद्दल मॅकडोनेलला अभिमान आहे अशी त्याची सर्वांगीण पद्धती असो. जे बरोबर म्हणून शब्द शोधले जातील व अर्थ लावले जातील ते निसर्गानुरूप अर्थास जवळचे असेच असतील व त्यामुळे ऋचांचे अर्थ जास्त जास्त चुकीचे होतील, आणि हेच घडत आहे.

आता हे कसे घडले आणि त्यामुळे ऋचांचे अर्थ किती विकृत झाले हे पाहू. त्यासाठी ऋचातील काही अत्यंत महत्त्वाच्या ( crucial ) शब्दांचा विचार करू.










### ऋचातील काही महत्त्वाच्या शब्दांचा विचार

ऋचातील वर्ण्य विषयाबद्दल जे काही निर्णायक शब्द आहेत त्यात ' पुर ' हा शब्द महत्त्वाचा आहे. वर दर्शविल्याप्रमाणे आपल्या मते ऋचातून ज्या देवांच्या स्तुती आहेत त्यात ऋचाकारांनी आपल्या पूर्वजांच्या विजिगिषेची वर्णने, देवानी त्यांच्यासाठी केलेले पराक्रम म्हणून वर्णिले आहेत. वास्तविक हे पराक्रम पूर्व आर्यांचे आहेत. त्यांचे तटबंदीची शहरे असलेल्या लोकाशी संग्राम झाले. आर्यांनी त्यांची शहरे जाळली व त्यांचा विध्वंस केला. ऋचात वर्णन असलेल्या शहरांचे व सिंधु-उत्खननात उपलब्ध झालेल्या शहरांचे सर्व बाबतीत साम्य आहे इतकेच नव्हे तर काही महत्त्वाच्या शहरांच्या नावात देखील साम्य आहे हे इतरत्र[३] दाखविले आहे. म्हणून ऋचात पुर हा शब्द शहर या अर्थी झाला आहे की तो काहीतरी मेघासारखा निसर्गातील वस्तुनिदर्शक आहे हे पाहणे निर्णायक ठरेल. ऋचांचा निसर्गानुरूप अर्थ लावणाऱ्या सर्व विद्वानानी ' पुर ' शब्दाचा अर्थ मेघ असा केला आहे.

ऋचा भारतातच उत्पन्न झाल्या, त्यांचे तेथेच रक्षण झाले व त्या आजतागायत तेथेच कायम आहे. ऋचांचे अर्थ लावताना संस्कृत, प्राकृत व भारतातील देशी भाषांचा विचार प्रामुख्याने व्हावयास पाहिजे परंतु नेमकी हीच गोष्ट सूक्ष्म पद्धतीत ( Crtical method) वगळलेली आहे. सूक्ष्मपद्धतीत शब्दाच्या धात्वर्थाची लॅटीन ग्रीक युरोपीय भाषा यांच्याशी तुलना करून अर्थ ठरविले जातात. भारतातील प्राकृत आणि देशी भाषांचा विचार केला जात नाही. संस्कृत, प्राकृत व भारतीय देशी भाषात पुर हा शब्द इतका सामान्य आणि सुपरिचित आहे की त्याच्या अर्थासाठी सूक्ष्मच काय परंतु कोणत्याच पद्धतीची जरूर नाही. परंतु सर्व लोकास माहित असलेले सुपरिचित अर्थ विकृत अर्थ लावण्यास उपयोगी पडत नाहीत. सूक्ष्म-पद्धतीसारखी पद्धती पाहिजे तसे अर्थ लावण्यास सोईची असते. वेदकालापासून आतापावेतो पुर या शब्दाचा अर्थ शहर असाच आहे. परंतु धात्वर्थावरून अर्थ लावणारानी पृ= fill या धातूवरून पुर ह्या शब्दाची व्युत्पत्ती लावली आहे. वास्तविक त्यालाही प्रत्यवाय घेण्यासारखे काही नाही. परंतु पुर या शब्दाचा अर्थ त्यानी जो citadel म्हणजे किल्ला असा दिला तो मात्र अगदी चुकीचा असून कोणत्याही व्युत्पत्तीस धरून नाही. तो निसर्गानुरूप अर्थ लावण्यास सोयीचा आहे हाच त्याचा विशेष. ऋचात ' शारदीः पुरः ' असा आणखी एक शब्द आहे. शारदीः पुरः याचा सायणाने ' शारदीः संवत्सरसंबंधिनीः प्राकार परिखा-दिभिर्दृढीकृतः शत्रूणां पुरीः ' तटबंदी व खंदक यांनी वर्षभर पक्की केलेली शत्रूंची शहरे ' असा अर्थ दिला आहे व तो बरोबरही आहे. परंतु निसर्गानुरूप अर्थ लावणारांना त्याचा अर्थ शरदृतुतील मेघ असा कराव-याचा आहे. कोणतीही पद्धती उपयोगात आणली तरी पुर याचा अर्थ मेघ होणे शक्य नाही. याचा अर्थ त्यानी शरदृतुतील किल्ले autumnal forts ( citadels ) असा केला, व शरदृतुतील किल्ले म्हणजे शरदृतुतील श्वेताभ्र असा निसर्गानुरुप अर्थास जुळणारा अर्थ केला. इन्द्राने शारदीय पुरांचा नाश केला म्हणजे इन्द्राने श्वेताभ्राचा नाश केला हे म्हणणे निसर्गानुरुप अर्थास बरोबर जुळते. परंतु ते ऋचातील माहितीच्या संपूर्ण विरुद्ध आणि चुकीचे आहे. ' शारदीः पुरः ' नावाची इतर शहरांपेक्षा जास्त पक्की दासांची सात शहरे होती ती पुरुकुत्साने दासापासून जिंकून घेतली. दाशराज्ञ युद्धात पुरुकुत्स मारला गेला तेव्हा ती सुदासाच्या ताब्यात गेली.

पुरः हा शब्द ऋचातून एकूण ४७ वेळा आला असून त्याचा अर्थ सर्व ठिकाणी शहर असाच आहे. आपण वर १-१३०-७ ही ऋचा उद्धृत केली आहे. त्या ऋचेत अतिथिग्व दिवोदासासाठी इंद्राने शम्बराची नव्वद शहरे फोडली; शम्बराला ठार मारले व त्याचे सर्व द्रव्य दिवोदासाला मिळवून दिले असे वर्णन आहे. ऋचातील तंत्राप्रमाणे ती दिवोदासासाठी इन्द्राने फोडली असे म्हटले असले तरी वास्तविक ती दिवोदासानेच फोडली, शम्बराला ठार मारले व त्याची शहरे जाळून टाकून त्याचे सर्व धन लुटले. वरील ऋचेत दिवोदासाने फोडलेली शहरे शम्बराची होती हे स्पष्ट आहे. ऋचांचा अर्थ विकृत चुकीचा आणि मनास वाटेल तसा काही तरी केल्याशिवाय पुर या शब्दाचा अर्थ मेघ असा करता येणे शक्य नाही.

३ ' सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदुसंस्कृती ' या पुस्तकात











शिवाय मेघ शम्बराचे होते व त्यांची संख्या नव्वद होती व ते जाळल्यावर शम्बराचे सर्व द्रव्य अतिथिग्वास मिळाले हे म्हणणे हास्यास्पद होईल. येथे ऋचाबद्दल आणखी एक अत्यंत महत्वाची गोष्ट सांगितली पाहिजे की ऋचातील सर्व मंडळातून जेथे जेथे अतिथिग्वाने शहरे फोडल्याचा उल्लेख आहे तेथे तेथे ती शम्बराचीच शहरे फोडली असा उल्लेख आहे. पुरासंबंधी आणखी काही ऋचांचा विचार करू. ऋचा १–५१–५ची दुसरी ओळ अशी–

" त्वं पिप्रोर्नृमणः प्रारुजः पुरः प्र ऋजिश्वानं दस्युहत्येष्वाविथ ।

" ( हे इन्द्रा ) तू नृमण पिप्रूची शहरे फोडील आणि दस्यूंची हत्या करण्याचे युद्धात ऋजिश्वानाचे रक्षण केले. " वरील ऋचेत इन्द्राने नृमण पिप्रूची शहरे फोडून ऋजिश्वानाचे दस्यूना ठार मारण्याच्या युद्धात रक्षण केले असे सांगितले आहे. तिचा ऋचातील तंत्राप्रमाणे अर्थ असा की ऋजिश्वानाने नृमण पिप्रूची शहरे फोडली व दस्यूना ठार मारले.

ऋचा १–५१–११ अशी–

मन्दिष्ट यदुशने काव्ये सचाँ इन्द्रो वङ्कू वङ्कुतराधितिष्ठति ।

उग्रो ययिं निरपः स्रोतसासृजद्वि शुष्णस्य दृंहिता ऐरयत्पुरः ॥

" जेव्हा उशना काव्यासह इन्द्र वाकड्या वाकड्या चालणाऱ्या घोड्याच्या रथात बसून भयंकर ( इंद्राने ) प्रवाह कोरडे केले व शुष्णाची तटबंदीची शहरे फोडली तेव्हा स्तुती झाली.

ही ऋचा कळण्यासाठी ऋचातील काही संदर्भ माहीत असण्याची आवश्यकता आहे. कुत्साने जेव्हा शुष्णाची तटबंदीची शहरे फोडली त्यावेळी उशना काव्य व इन्द्र यांनी त्याचे स्वागत केले व त्यास आपल्या रथात बसवून घेऊन आपल्या घरी नेले तेव्हा इन्द्रपत्नीने त्याचे इन्द्राप्रमाणे स्वागत केले. इन्द्राने आपल्या रथात बसवून घेतल्यामुळे कुत्साला सारथी असे नाव मिळाले. वरील ऋचेत कुत्साने शुष्णाची तटबंदीची शहरे ( दृंहिता पुरः ) फोडली ही गोष्ट सांगितली आहे. वरील ऋचेत एका अत्यंत महत्वाच्या गोष्टीकडे लक्ष द्यावयास पाहिजे. ती वाहणारे स्रोत कोरडे केले ही होय. तटबंदीची शहरे नद्यांच्या काठी वसली असून नद्यांच्या पाण्याचा खंदकातून शहरास वेढा घातलेला असे. शहरे फोडण्यापूर्वी हे खंदक फोडून पाणी मूळच्या मार्गाने काढून देऊन खंदक कोरडे केले जात होते. त्यासाठी ऋचातून निरपं अथवा 'निरपमौब्जमर्णवम्' असे शब्दप्रयोग वापरले आहेत. दृंहिताः पुरः असे शहराचे वर्णन ते मेघ नसून तटबंदीची सभोवती मोठे खंदक असलेली शहरे होती हे निश्चितपणे दाखविते. येथे प्रामुख्याने हे लक्षात घ्यावयास पाहिजे की शहरे नद्याकाठी वसविली असून त्याना तटबंदी व खंदक असणे व खंदकातून नद्याचे पाणी घेतले असणे या सर्व बाबतीत दासांच्या शहराचे सिंधुशहराशी ऐक्य आहे. ऋचा १-५३-८ येणे प्रमाणे–

त्वं करञ्जमुत पर्णयं वधीस्तेजिष्ठयातिथिग्वस्य वर्तनी ।

त्वं शता वङ्गृदस्याभिनत्पुरोऽनानुदः परिषूता ऋजिश्वना ॥

" ( हे इन्द्रा ) तू करंजाला तसेच पर्णयाला अतिथिग्वाच्या तेजोमय ( अग्नीचा उपयोग केल्यामुळे ) वेढ्याने ठार मारले. तू वङ्गृदाची शंभर शहरे ऋजिश्वनासाठी वेढा घालून एकट्याने फोडलीस."

वरील ऋचेत ऋजिश्वनाने वेढा घालून वङ्गृदाची शहरे फोडल्याचा उल्लेख आहे.

ऋचा १-६३-७ ची पहिली ओळ अशी–

त्वं ह त्यदिन्द्र सप्त युध्यन्पुरो वज्रिन्पुरुकुत्साय दर्दः ।

" ( हे इन्द्रा ) तू ती प्रसिद्ध सात शहरे लढून पुरुकुत्सासाठी फोडली " ह्या ऋचेत पुरुकुत्साने दासांची सात शारदीय पुरे जिंकून घेतल्याचा उल्लेख आहे. शारदीः पुरे सात असून ती दासाजवळून पुरुकुत्साने जिंकून घेतल्याचा उल्लेख अनेक ऋचातून आहे. त्यापैकी ऋचा ६–२०–१० ची दुसरी ओळ अशी –

सप्त यत्पुरः शर्म शारदीर्दर्द्धन्दासीः पुरुकुत्साय शिक्षन् ।

" ( इन्द्रा तू ) पुरुकुत्साच्या कल्याणासाठी दासांची सात प्रसिद्ध शारदीय पुरे फोडलीस "

या ऋचेत पुरुकुत्साने दासांची सात शारदीय पुरे फोडल्याचा उल्लेख आहे. शारदीय पुरे दासांची प्रसिद्ध आणि जास्त पक्की शहरे होती ते मेघ नव्हते हे ऋचावरून स्पष्ट आहे.

पुरे म्हणजे दासांची तटबंदीची खंदक आणि दारे असलेली पुरे ही गोष्ट ऋचातून उघडपणे दिसते. ह्या शहरांचा आर्यांनी विनाश केला व तो अग्नीच्या साह्याने केला हीही गोष्ट ऋचातून अगदी स्पष्ट आहे. ऋचा ३–१५–४ ची पहिली ओळ अशी–

अषाळ्हो अग्ने वृषभो दिदीहि पुरो
विश्वाः सौभगा संजिगीवान् ।

"हे जयशाली, सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या अग्ने, शत्रूंची शहरे, तेथील सर्व उत्तम धने जिंकून जाळून टाक"

अग्नीच्या साह्याने आर्यांनी दासांची शहरे जाळल्याबद्दल अनेक ऋचा आहेत. वरील ऋचेवरून ते अगदी उघड होईल. ऋचा ३–१२–६ ही तेच सांगितले आहे. ती ऋचा अशी-

इन्द्राग्नी नवतिं पुरो दासपत्नीरधूनुतम् ।
साकमेकेन कर्मणा ॥

"हे इन्द्राग्नी तुम्ही दासांनी रक्षण केलेली नव्वद शहरे एकाच कर्माने एकदम हालविली."

पुर हा शब्द दासांच्या तटबंदीच्या खंदक आणि दरवाजे असलेल्या शहरांचा वाचक आहे ही गोष्ट स्पष्टपणे कळण्यास वरील ऋचा पुरेशा आहे. अशा ऋचा इतक्या पुष्कळ आणि स्पष्ट आहेत की पुर या शब्दाबद्दल वाद असण्याचे वास्तविक कारण असू नये परंतु यास्कापासून आधुनिक पाश्चात्य लेखकापावेतो 'पुर' ह्या शब्दाचा अर्थ चुकीने मेघ असा करण्यात आला. शारदीः पुरः या शब्दाचा अर्थ मेघ कसा करण्यात आला हे पाहण्यासाठी यास्काच्या निरुक्तरूढीने केलेले सायणाचे ऋचा १-१७४-२ या ऋचेवरील भाष्य ऋचेसहित येथे उद्धृत केले आहे ते असे–

दनो विश इन्द्र मृध्रवाचः सप्त यत्पुरः शर्म शारदीर्दत् ।
ऋणोरपो अनवद्यार्णा यूने वृत्रं पुरुकुत्साय रन्धीः ॥
१–१७४–२

"हे इन्द्रा जेव्हा तू तरुण पुरुकुत्सासाठी सात शारदीय पुरे सुखाने फोडलीस तेव्हा जीभ कापली असलेल्या प्रजेचे दमन केले, न वाहणारे पाण्याचे साठे वाहावयास लावले व शत्रूला ठार मारले."

या ऋचेवरील सायणाचे संपूर्ण भाष्य दिले आहे ते असे–

"हे V इन्द्र त्वं वृत्रसंबन्ध्यसुराणां पुरभेदनसमये V मृध्रवाचः मर्षणवचनाः V विशः तदीया प्रजाः V शर्म सुखं यथा भवति तथा V दनः अदमयः ॥ दमेरिदं रूपम् । यद्वा वर्णव्यत्ययः । नदः । अनदः अशब्दयः असुरप्रजाः । अतिभयंकरशब्दमकरोः । कदेति आह । V यत यदा V शारदीः प्रत्यग्राः । यद्वा । एतत्संवत्सरलक्षकः । संवत्सरपर्यन्तं दृढी कृता अपि । V सप्त V पुरः एतत्संख्याकाः पुरीः V दत् अदारयः ॥ पुरुषव्यत्ययः दृणातेर्लङि छान्दसो विकरणस्य लुक् । 'रात्सस्य' (पा. सू. ८-२-२४) इति नियमात् तलोपा भावः ॥ तथा कृत्वा हे अनवद्य कातरत्वानिन्दावत् हे इन्द्र V अर्णाः अरणशीलाः V अपः तदीयदुर्गस्थानानि उदकाश्रयाणि तटाकादीन् V ऋणोः । अगमयः प्रावर्तयः । भग्नान्यकरोः । एवमुपद्रुत्य V पुरुकुत्साय एतन्नाम्ने राज्ञे V यूने नित्यतरुणाय तदर्थं । V वृत्रम् एतन्नामकमसुरं । रन्धीः असाधयः अहनः । अयमैतिहासिकपक्षः । निरुक्तरुढया तु हे इन्द्र मृध्रवाचो विशः मर्षणध्वनियुक्ता वृष्टिरुपाः प्रजा दनः अदमयः । अशब्दयो वा । अवर्षय इत्यर्थः । कदा । यद्यदा सप्त पुरः शारदीर्दत् सर्पण स्वभावान् प्रत्यग्रान् वृष्ट्या जगत्पूरकान् मेघानदारयः तदेत्यर्थः । तथाकृत्वा हे अनवद्य अर्णाः अरणस्वभावा अपः ऋणोः अगमयः प्रावर्तयः कुल्यादिरुपेणः । अनंतरं यूने पुरुकुत्साय वृत्रं मुख्यं मेघं असाधयः अहनः । अयमर्थः 'त्वं ह त्यदिन्द्र सप्त युद्धन्' (ऋ. सं. १–६३–७) इत्यादि मन्त्रांतरेषु प्रसिद्धः । यास्कस्त्वेवं व्याख्यात् 'दनो दानमनसो नो मनुष्यानिन्द्र मृदुवाचः कुरु' (निरु. ६–३१) इति"

ऋचा १–१७४–२ वरील सायणाचे भाष्य संपूर्ण उद्धृत केले आहे त्यावरून हे निदर्शनास येईल की सायणाने वरील ऋचेचे दोन अर्थ दिले आहेत. पहिला अर्थ देऊन त्याचे शेवटी 'अयमैतिहासिकपक्षः' हा (ऐतिहासिक पक्ष आहे) असे म्हटले. नंतर 'निरुक्तरुढया तु' (निरुक्त रुढीने) असे म्हणून निरुक्तरुढीचा निसर्गानुरुप अर्थ दिला. यास्काची निरुक्तरुढी हा निसर्गानुरूप अर्थाचा पर्यायवाचक शब्द











झाला. त्या ऋचेतील शब्दांचे अर्थ कसे बदलले व ऋचांचे अर्थ कसे वेगळे, चुकीचे आणि विकृत झाले हे दिसावे म्हणून निरुक्तरुढीने दिलेलेही संपूर्ण भाष्य दिले. वरील भाष्यावरून सायण ऋचांना ऐतिहासिक बाजू आहे असे मानत होता असे दिसते. सायणाचा ऐतिहासिक पक्ष म्हणजे आपण ज्या अर्थी इतिहास शब्दाचा अर्थ समजतो त्या अर्थी नव्हे. सायणाला ऋचांच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीची कल्पना नसली तरी सायण ऋचातील वर्णने नसून निसर्गाची वर्णने शब्दाचे अर्थ आहेत त्याप्रमाणे त्यांचे अर्थ आहेत असे मानणारा होता व त्याने प्रथम शब्दाच्या अर्थाप्रमाणे अर्थ दिला. निरुक्तरुढीने नंतर शब्दांचे निसर्गानुरूप अर्थ लावून अर्थ दिला. हे अर्थ कसे विचित्र व शब्दांच्या अर्थास सोडून आहेत हे पाहू. मृध्रवाचः विशः याचा वास्तविक अर्थ कापलेल्या जिभा असलेली प्रजा असा आहे. मृध्रवाचः या शब्दात मृध्र आणि वाचः असे दोन शब्द आहेत. मृध्र याचा अर्थ हिंसित म्हणजे कापलेल्या व वाचः म्हणजे जिभा असा असून मृध्रवाचः या सामासिक शब्दाचा अर्थ कापलेल्या जिभा असलेली असा आहे. तो विशः म्हणजे प्रजा या शब्दाचे विशेषण आहे. दनः म्हणजे दमन करणे. 'इन्द्र मृध्रवाचः विशः दनः' म्हणजे इन्द्राने कापलेल्या जिव्हा असलेल्या प्रजेचे दमन केले असा वास्तविक अर्थ आहे. परंतु निसर्गानुरूप अर्थ मृध्रवाचा विशः म्हणजे मर्षणध्वनियुक्ता वृष्टिरूपाप्रजा असा दिला आहे. मृध्रवाचः या शब्दाचा अर्थ मर्षणध्वनियुक्तः असा नाही हे उघड आहे. तसेच विशः म्हणजे प्रजा त्या शब्दाचा अर्थ पाऊस असा बिलकूल होऊ शकत नाही. त्याचा अर्थ पाऊस दिला तो चुकीचा आणि भलताच आहे. निसर्गानुरूप अर्थ लावण्यासाठी भलभलते शब्दातून मुळीच न निघणारे चुकीचे अर्थ देऊन काहीतरी भलतेच अर्थ लावले आहेत. आणि मर्षणध्वनियुक्त वर्षारूपी ध्वनीचे दमन केले म्हणजे काय ते कळत नाही ते वेगळेच. सप्त पुरः शारदीर्दत् या शब्दाचा अर्थ सात शारदीय पुरे फोडली असा आहे. त्याचा अर्थ सर्पण स्वभावान् प्रत्यग्रान् वृष्ट्या जगत्पुरकान्मेघानदारयः असा दिला आहे. त्याचा मूळच्या ऋचेतील शब्दाशी काहीच संबंध नाही. शारदीः सरकणारे आणि पुर म्हणजे मेघ असे काही तरी अत्यंत चुकीचे आणि ऋचातील अर्थाशी संबंध नसलेले अर्थ दिले. त्यानी ऋचांचे काहीही अर्थ लागत नाहीत ऋचांचे अर्थ चुकीचे, दुर्बोध काहीतरी वेडे वाकडे व विकृत होतात. सात शारदीय पुरे का म्हटले, मेघांना सात हे विशेषण का लावले याचाही विचार केला नाही. अर्ण वाहावयास लावले असे ऋचात असताना पावसाच्या वृष्टीने ओहोळ निघाले असे काही तरी चुकीचे आणि वेडेवाकडे अर्थ दिले आहेत. सगळ्यावर कळस म्हणजे वृत्र या शब्दाचा अर्थ मुख्यं मेघं म्हणजे मुख्य मेघ असा दिला आहे. आणि त्याला तरुण का म्हटले तेही सांगितले नाही आणि मेघाला ठार कसे मारतात त्याचाही उलगडा केला नाही. शिवाय ते पुरूकुत्सासाठी का ? या कशाचीही संगती लागत नाही. सर्व ऋचा अर्थशून्य आणि विकृत होतात.

ऋचात आर्यांचे त्यांच्या शत्रूंशी जे संग्राम झाले त्याची नुसती नावे सांगितली तरी हे संग्राम वर दर्शविलेल्या निरूक्तरूढीप्रमाणे निसर्गातील मेघ, पाऊस इत्यादीचे संग्राम नसून आर्यांचे त्यांच्या दास, दस्यू, पणी इत्यादी नावानी संबोधिलेल्या तटबंदीच्या शहरात राहणाऱ्या शत्रूंशी संग्राम झाले हे उघड होईल. ह्या संग्रामांची जी नावे ऋचातून आली आहेत ती अशी–

(१) पुर्भिद्य– शत्रूंची शहरे फोडण्यासाठी संग्राम;

(२) दस्युहत्य– दस्यूंची हत्या करण्यासाठी संग्राम;

(३) अर्कसाता किंवा वाजसाता– शत्रूंचे अन्न लुटण्यासाठी युद्ध;

(४) क्षेत्रसाता– शत्रूंची शेते काबीज करण्यासाठी युद्ध;

(५) गोसाता– शत्रूंच्या गायी वळवून आणण्यासाठी युद्ध;

(६) धनसाता– शत्रूंचे धन लुटण्यासाठी युद्ध;

(७) सर्वसाता– शत्रूंचे सर्वस्व लुटण्यासाठी युद्ध;

(८) अश्वायन्तो– (४.१७.१६) शत्रूचे घोडे काबीज करण्यासाठी युद्ध;

(९) जनीयन्त– (४. १७. १६) शत्रूच्या स्त्रिया पकडून आणण्यासाठी युद्ध;












( १० ) तोके ( ६.२५.४ )– शत्रूंची मुले मिळविण्यासाठी युद्ध;

( ११ ) तनये (६. २५. ४)– शत्रूंची लहान मुले ( नातू ) मिळविण्यासाठी युद्ध;

( १२ ) अप्सु ( ६. २५. ४)– शत्रूंची जलाशये काबीज करण्यासाठी युद्ध.

वरील युद्धांच्या नावावरून हे संग्राम निसर्गातील घडणाऱ्या घडामोडींची वर्णने नसून खऱ्याखुऱ्या युद्धांची वर्णने आहेत हे उघड होईल. पुर याचा अर्थ शहर असून मेघ नाही हेही उघड होईल.

ऋचात वर्णन असलेल्या कुत्स, अतिथिग्व दिवोदास, सुदास, पुरुकुत्स, सुश्रवस, कुरुश्रवण इत्यादी सर्व व्यक्ती ऐतिहासिक व्यक्ती असून ऋचातून त्यांच्याबद्दल काय ऐतिहासिक माहिती मिळते ते इतरत्र[1] साकल्याने पाहिले. त्यांनी दासांची तटबंदीची सभोवार खंदक व दरवाजे असलेली शहरे उध्वस्त केली. भोवतालचे खंदक फोडून टाकले. त्याचीच वर्णने ऋचातून आहेत. पुरभिद्य संग्रामाचा अर्थही शहरे फोडण्यासाठी संग्राम हा उघड आहे. असे असताही यास्कापासून आधुनिक पाश्चात्य लेखकांपावेतो शहरांना मेघ ठरवून ऋचातील ऐतिहासिक वर्णने काल्पनिक व विकृत करून ऋग्वेदासारखे अत्यंत प्राचीन व मौलिक वाङ्मय निरर्थक, दुर्बोध व विचित्र बनविले. यास्काने पुरांचे अर्थ मेघ कसे केले ते आपण पाहिले. पाश्चात्य विद्वानांनी शारदीः या शब्दाचा Autumn म्हणजे शरद्‌तु व पुर या शब्दाचा अर्थ citadel किल्ला असा घेऊन शारदीः पुरः याचा अर्थ शरद्‌तुतील किल्ले ( autumnal fort ) म्हणजे शरद्‌तुतील मेघ असा अर्थ केला. तोही काल्पनिक चुकीचा, विकृत, ऋचात अभिप्रेत नसलेला व ऋचातील संदर्भाशी जुळत नसलेला आहे हे वरील विवेचनावरून उघड होईल.

ह्या सर्व चुकीचे कारण ऋचांच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीचे अज्ञान व तदनुषंगाने ऋचातील वर्ण्य विषयाबद्दल चुकीचा समज होय. याहीपेक्षा मोठे आणि महत्वाचे कारण म्हणजे ऋचातील तंत्राबद्दलचे अज्ञान होय. ऋचात वर्णिलेले पराक्रम ऋचातून स्तुती असलेल्या देवानी केले असे ऋचातून वर्णन आहे. त्याचबरोबर ते ज्या व्यक्तिसाठी केले आहेत त्याचाही उल्लेख आहे. जसे वरील ऋचेत सात शारदीय पुरे इन्द्राने फोडली असा उल्लेख आहे. परंतु त्या बरोबर ती पुरुकुत्सासाठी फोडली असा उल्लेख आहे. ऋचातील सर्व वर्णने अशीच आहेत. त्याचा सरळ अर्थ असा की शहरे इन्द्राने पुरूकुत्सासाठी फोडली असे वर्णन असले तरी तो वास्तविक पुरुकुत्सानेच फोडली असे समजावयाचे हे ऋचातील तंत्र आहे व ते सर्वत्र अवलंबिले आहे. ऋचाकारानी देवाची सूक्ते करीत असताना आपल्या पूर्वजांच्या विजिगिषेचा इतिहास दिला असून ती त्यांच्यावर झालेली देवाची कृपा होय असे म्हणून देवांचा मोठेपणा वर्णिला आहे.

ह्या दोन्ही न समजून ऋचातून वरवर दिसणारी सर्व पराक्रम देवानीच केले ही गोष्ट खरी मानून शहरे इन्द्राने फोडली ही गोष्ट अक्षरशः खरी धरली. त्यामुळे जी अनर्थ परंपरा ओढवली त्याचे ओझरते दर्शन घडविणे प्रस्तुत आहे. ऋचातील पराक्रम इंद्रादी देवांनी केले असे मानल्याबरोबर देवानी केलेले पराक्रम अतिमानुष व दैवी असावे हे मानणे पर्यायानेच येते. ऋचातील देव निसर्गातील शक्तीची प्रतीके असल्यामुळे त्यानी केलेले पराक्रम निसर्गातील घडामोडीची वर्णने असावीत अशी कल्पना ओघानेच येते. अशी उत्पन्न झाल्यावर ऋचातील सर्व वर्णनाकडे निसर्गातील वर्णनाच्या दृष्टीने पाहणे क्रमप्राप्तच आहे. अशा परिस्थितीत आर्यांच्या शत्रूंची शहरे मेघ बनल्यास नवल नाही.

## दास, दस्यू , पणी

तटबंदीची शहरे मेघ मानल्यावर त्यात राहणारे दास, दस्यू , पणी म्हणून संबोधिलेले आर्यांचे शत्रू मेघात राहणारे कोणीतरी अतिमानुष शक्तीचे काल्पनिक प्राणी असावे असे मानणे क्रमप्राप्तच आहे. त्यांना इंद्राने ठार मारले असे ऋचातून वर्णन असल्यामुळे वरील कल्पना जास्तच बळकट होते. त्यांच्या संबंधित वर्णनाकडे त्याच दृष्टीने पाहिले जाणे अगदी स्वाभाविक आहे. व ऋचा निसर्गातील चमत्काराचे व घडामोडीचे वर्णन तसेच अतिमानुष शक्तीच्या दुष्ट प्राण्याचे

१. सिंधुसंस्कृती ऋग्वेद व हिंदुसंस्कृती या पुस्तकात.










वर्णन बनतात व अगदी सोप्या व सरळ शब्दाचे अर्थ विकृत होतात. ही कल्पना यास्कापासून ज्याचे वेदिक रीडर भारतीय विद्यापीठात पाठ्यपुस्तक आहे त्या मॅकडोनेलपर्यंत सारखी कायम आहे व ऋचात इंद्रादी देवाने राक्षस पिशाचाना मारण्याच्या काल्पनिक गोष्टी आहेत हे शिकविणे सुरू आहे. त्यामुळे सामान्य लोकातच नव्हे तरी भारतातील विद्वान समजल्या जाणाऱ्या लोकातही ऋचाबद्दल अत्यंत विकृत आणि काल्पनिक कल्पना रूढ आहे.

अशा कल्पना ऋचांचे अर्थ लावणाऱ्या प्राचीन भाष्यकारातच नव्हत्या तर तुलनात्मक ऐतिहासिक संशोधनाच्या पद्धतीने आपण वेदाचे अर्थ बरोबर लावले अशी धन्यता मानणाऱ्या मॅकडोनेलचीही तीच स्थिती. सूक्ष्म पद्धतीचे कितीही गोडवे गायिले तरी ऋग्वेदाच्या वर्ण्यविषयाबद्दल व ऋचांच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीबद्दल गाढ अज्ञान, नव्हे अत्यंत विकृत कल्पना व ऋचातील वर दर्शविलेल्या तंत्राचे अज्ञान यामुळे त्याला वेदाच्या वर्ण्य विषयाबद्दल स्थूल स्वरुपाचीही कल्पना येऊ शकली नाही मग बरोबर अर्थ लावण्याची गोष्ट तर दूरच राहिली. क्रिटिकल पद्धती उपयुक्त आहे परंतु तिचा उपयोग करून जे अर्थ शोधून काढावयाचे त्यांबद्दल चुकीच्या आणि विकृत कल्पना असल्यामुळे ती ज्या गावास जावयाचे आहे त्याच्या विरुद्ध दिशेने भरधाव पळणाऱ्या घोड्यासारखी झाली. मॅकडोनेलने आपल्या वेदिक रीडरच्या सुरवातीस एक प्रस्तावना जोडली आहे. त्यात ऋचात वर्णिलेले आर्यांचे दास, दस्यु, पणि म्हणून वर्णिलेले शत्रू पिशाच आहेत असे गृहीत धरून लिहिले आहे ते असे–

The demons often mentioned in the hymns are of two kinds. The higher and more powerful class are the aerial foes of gods. There are seldom called Asura in the R, V. Where in the older parts that word means a divine being like Ahur in the Avesta. The term Dasa and Dasyu, properly the name of dark aborigines, is frequently used in the sense of fiend to designate the aerial demons. The conflict is regularly one between a single god and a single demon, as exemplified by Indra and Vṛtra. The latter is by far the most frequently mentioned. His mother being called Danu, he is some times alluded to by the metronymic term Danava. Another powerful demon is Vala, the personified cave of the cows, which he guards, and which are set free by Indra and his allies notably the Anigirasas. other demon adversaries of Indra are Arbud described as wily beast, whose cows Indra drove out. Viśvarup son of Tvaṣṭr a three headed demon slain by both Trita and Indra, who seize his cows; and Svarbhanu who elapses the sun. There are several other individual demons, generally described as Dasas and slain by Indra. A group of demons are the Panis ( Niggards ) Primarily foes of Indra, who with the aid of dog Sarama tracks and releases the cows hidden by them.

वरील उताऱ्यावरून मॅकडोनेलची दास, दस्यू आणि पणीबद्दल काय कल्पना आहे ते ध्यानात येईल. त्याने त्याना aerial Demen असे म्हटले आहे. दास आणि दस्यू या शब्दांच्या अर्थात अथवा ऋचात त्याला काहीही आधार नाही. त्याने त्याना 'डेमन' का म्हटले ते कळण्यास मार्ग नाही. वरील उताऱ्यावरून इन्द्राने त्याना मारले म्हणून त्याना 'डेमन' म्हटले असावे असे दिसते. तसेच त्याना हवेतील ( aerial ) का म्हटले तेही कळत नाही कदाचित् ते मेघात










राहणारे अशी त्याची कल्पना असावी. दास आणि दस्यू याना इन्द्राने मारले म्हणून ते कोणी अतिमानुषप्राणी असावे अशी मॅकेडोनेलची कल्पना दिसते. आपण वर ऋचातील तंत्राचा विचार केला आहे. हे ऋचातील तंत्र न कळल्यामुळे यास्कापासून मॅकडोनेलपर्यंत कशा चुका झाल्या ते स्पष्ट दिसते. दास आणि दस्यू यांची युद्धे इन्द्राशी झाली व इन्द्राने त्यांना ठार मारले हे मानणे पहिली मोठी चूक आहे व ही चूक एकदा केली की चुकीची परंपरा आपोआप निर्माण होऊन ऋचा कशा काल्पनिक आणि विकृत होतात हें आपण पाहिले. दास, दस्यु आणि पणी म्हणून संबोधिलेले लोक एकच असून ते तटबंदीच्या शहरात राहणारे समृद्ध लोक होते. आर्यांचे त्यांच्या बरोबर संग्राम होऊन त्याची शहरे जाळली व त्याच्या फार मोठ्या प्रमाणावर कत्तली केल्या. हीच गोष्ट ऋचात फार स्पष्टपणे सांगितली. ही युद्धे वैयक्तिक होती असे जे मॅकडोनेलने म्हटले ते ऋचातील माहितीच्या अत्यंत विरुद्ध असून चूक आहे. मॅकडोनेलला ऋचातील वर्ण्य विषयाची, तसेच ऐतिहासिक पार्श्वभूमीची आणि ऋचातील तंत्राची काहीही कल्पना नसल्यामुळे किंबहुना विकृत आणि चुकीच्या कल्पना असल्यामुळे त्याला ऋचातील विषयाची स्थूल स्वरूपात देखील कल्पना येऊ शकली नाही. आर्यांनी दासाची शहरे जाळून फार भयंकर स्वरुपाच्या कत्तली केल्या. त्याची काहीशी कल्पना यावी म्हणून काही ऋचा उद्धृत करणे आवश्यक आहे. ऋचा ४–१६–१३ अशी–

त्वं पिप्रुं मृगयं शूशुवांसमृजिश्वने वैदथिनाय रन्धीः।
पञ्चाशत–कृष्णा नि वपः सहस्रात्कं न पुरो जरिमा
वि दर्दः ॥

"(हे इन्द्रा) तू विदथिपुत्र ऋजिश्वनासाठी पिप्रु, मृगय आणि शूशुवांसाला ठार मारले. पन्नास हजार काळ्या लेकाना कापून काढलेस व जरा ज्या प्रमाणे रूपाचा नाश करते त्याप्रमाणे त्यांच्या शहराचा नाश केलास."

ऋचेतील तंत्राप्रमाणे हे पराक्रम जरी इन्द्राने केले असे म्हटले असले तरी ते विदथीपुत्र ऋजिश्वनासाठी केले असल्यामुळे ते त्यानेच केले असे समजले पाहिजे. विदथीपुत्र ऋजिश्वनाने पिप्रु, मृगय व शूशुवांस याना ठार मारून त्यांचे पन्नास हजार लोक कापून काढले व त्याच्या शहरांचा नाश केला. हे सर्व लोक मॅकडोनेल म्हणतो तसे हवेतील पिशाच्च नव्हते व त्याना इन्द्राने मारलेही नाही. फिरून ती एकएकट्याची युद्धे नव्हती. ऋचा ४–१६–१२ मध्ये कुत्साने शुष्णास आणि कुयवास ठार मारले त्या वेळी वेढा घालून हजारो दस्यूना मारून टाकल्याचे वर्णन आहे. ऋचा २–१४–६, ४–३०–१५, ६–४७–२१ व ७–९९–५ मध्ये अतिथिग्व दिवोदासाने वर्चीला ठार मारले त्या वेळी पन्नास हजार दासांची कत्तल केल्याचे वर्णन आहे. त्यापैकी ऋचा ४–३०–१५ अशी–

उत दासस्य वर्चिनः सहस्राणि शतावधीः ।
अधि पञ्च प्रधीँरिव ॥

"(हे इन्द्रा) चाकाच्या वलयाप्रमाणे (कडे करून उभे असलेल्या) वर्ची नावाच्या दासाच्या पन्नास हजार लोकाना तू ठार मारलेस." आर्य लोक एकत्र होऊन दासांची फार मोठया प्रमाणावर कत्तल करीत. कुत्स, आयु आणि अतिथिग्व दिवोदास हे तीन प्रबळ आर्य एकत्र होऊन शेकडो आणि हजारो ठिकाणी दस्यूंची फार मोठया प्रमाणावर कत्तल केल्याची वर्णने अनेक ऋचात आहेत (२–१४–७) दभितीसाठी चमुरी आणि धुनीला ठार मारून इन्द्राने हजारो दस्यूंना कापून काढल्याचे वर्णन ६–२६–६ मध्ये आहे. अशी ऋचातील दास आणि दस्यू म्हणून संबोधिलेल्या लोकांच्या आर्यांनी केलेल्या कत्तलीची वर्णने आहेत. त्यावरून मॅकडोनेलच्या ऋचाबद्दलच्या कल्पना चुकीच्या आणि विकृत आहेत हे अगदी उघड आहे. आता दास, दस्यू आणि पणी ह्या नावाबद्दल सूक्ष्म पद्धतीने विचार करू. दास आणि दस्यू या दोन्ही शब्दांच्या व्युत्पत्तीबद्दल मॅकडोनेलला काहीही निश्चित कल्पना करता आली नाही. दास आणि दस्यू यांचे वर उताऱ्यात दाखविल्याप्रमाणे हवेतील पिशाच्च आणि इन्द्राचे शत्रू असे वर्णन केले तरी त्या दोन्ही शब्दांचे अर्थ non Aryan असा दिला आहे व त्या दोहोंच्या दोन वेगळया व्युत्पत्ती दिल्या आहेत. दास आणि दस्यू यांच्या स्वरूपाबद्दल मॅकडोनेलच्या मनात फार गोंधळ आहे एके ठिकाणी












तो त्याना हवेतील पिशाच्च म्हणतो तर एके ठिकाणी आर्यांचे रानटी शत्रू म्हणतो. हा असा गोंधळ होण्यास फार सबळ कारण आहे. ऋचांचा निसर्गानुरूप अर्थ लावणारे भारतीय आणि पाश्चात्त्य विद्वान दास दस्यू आणि पणी कोणी इन्द्राच्या बरोबरीचे अतिमानुष लोक मानतात तर ऋचात आर्यांच्या रानटी लोकाबरोबरच्या युद्धांचे वर्णन आहे असे मानणारे पाश्चात्त्य लोक दास दस्यू आणि पणी हे आर्यांचे रानटी शत्रू असावे असे मानतात. ऋचांचा निसर्गानुरूप अर्थ लावणारे पुर म्हणजे मेघ म्हणतात तर आर्यांचे शत्रू रानटी होते असे म्हणणारे पुर म्हणजे सभोवती लाकडे रोवलेली जमिनीतील छिद्रे समजतात. यात प्रामुख्याने पॉशेल आणि गेल्डनरचा समावेश आहे. मॅकडोनेल या दोन्ही प्रकारच्या पाश्चात्त्य विद्वानांच्या मतापैकी दोन्ही बरोबर धरून दोन्ही प्रकारचे परस्परविरोधी अर्थ देतो. त्यामुळे त्याला निश्चित काय म्हणावयाचे ते कळत नाही. मॅकडोनेलला दास आणि दस्यू यांच्या स्वरूपाची नीट कल्पना नसल्यामुळे किंबहुना पूर्णतया विकृत कल्पना असल्यामुळे त्याला त्या शब्दाचे बरोबर अर्थ देणे शक्य नाही. दास आणि दस्यू हे दोन्ही शब्द ऋचात समानार्थी आर्यांचे शत्रू या अर्थी आहे. सायणाने त्याचे निरुक्त ‘ दसु उपक्षये ’ असे दिले आहेत. तेही बरोबर आहे असे प्रस्तुत लेखकास वाटत नाही. दास आणि दस्यु हे दोन्ही शब्द ‘ दस ’ दंश करणे या धातूवरून झाले असून ते आर्यांच्या नागवंशीय शत्रूंचे निदर्शक आहेत. त्यांचा अर्थ दंश करणारा असा आहे. हा अर्थ बरोबर आहे असे मानण्यास सबळ कारणे आहेत. तसेच तो अर्थ घेतला असता ऋचातील सर्व शब्दांची योग्य संगती लागते. दास आणि दस्यू यांना ऋचातून ‘ वृत्रस्य शेषाः ’ म्हणजे वृत्राचे संतान असे म्हटले आहे. वृत्र हा शब्द ऋचातून अनेक वेळा आला आहे. वृत्र हा शब्द वृ आवरणे या धातुवरून आला असून त्याचा अर्थ आवरण करून घेणारा असा आहे. आर्यांचे शत्रू तटबंदीच्या शहरात रहात असत व तटबंदीनी आवरण करून घेत असत. वृत्र हा शब्द आर्यांच्या शत्रूंचा निदर्शक आहे. वृत्र शब्द जेव्हा दानूचा मुलगा ज्याला इंद्राने झोपला असताना मारले व ज्याच्या वृद्ध आईलाही ठार मारले व ज्याच्या अंगावरून पाणी वहात होते असे येते तेव्हा ते अतिथिग्व दिवोदासाने ठार मारलेल्या शम्बरासंबंधी असते. ऋचा २–१२–११ अशी–

यः शम्बरं पर्वतेषु क्षियन्तं चत्वारिंश्यां शरद्यन्वविन्दत् ।
ओजायमानं यो अहिं जघान दानुं शयानं स जनास इन्द्रः ।।

“ ज्याने चाळीस वर्षे लपून असलेल्या शम्बराला शोधून काढून झोपला असता क्रुद्ध होऊन दानुसहित अहीला ठार मारले, हे लोकहो तो इन्द्र ! ”

शम्बराला अतिथिग्व दिवोदासाने ठार मारले याचा उल्लेख अनेक ऋचातून आहे. तेच इन्द्राचे कार्य म्हणून वर्णिले आहे. शम्बर हा दानूचा मुलगा होता व तो झोपला असता अतिथिग्व दिवोदासाने त्यास ठार मारले. व शहराचे खंदक फोडल्यामुळे पाणी त्याच्या अंगावरून गेले. अही हा शब्द वृत्राचा पर्यायवाचक शब्द आहे. तो वृत्र या अर्थी ऋचातून ४७ वेळा वापरला आहे. वरील ऋचेत शम्बरालाही अही म्हटले आहे. ऋचातील तंत्राची जाणीव नसल्यामुळे वृत्र नावाचा कोणी व्यक्तिगत इन्द्राचा शत्रू होता व त्याच्या आईचे नाव दानू होते हे मॅकडोनेलचे म्हणणे चुकीचे आहे. वृत्र आणि अही म्हणजे नाग हे शब्द ऋचात समानार्थी आहेत. दास आणि दस्यूना वृत्राचे म्हणजे अहीचे वंशज म्हणतात यावरून ते नागवंशीय होते आणि त्याच अर्थी त्यांची दास आणि दस्यू ही नावे आहेत हे उघड आहे. याशिवाय दुसरेही महत्त्वाचे कारण आहे. आर्यांच्या दास आणि दस्यू नामक शत्रूना ऋचात मृध्रवाचः अथवा मृधः असे संबोधिले आहे. मृध्रवाचः प्रजेचे पुरुकुत्सासाठी इन्द्राने दमन केले असा उल्लेख वर ऋचा १–१७४–२ मध्ये आला आहे. मृध्रवाचः या शब्दात मृध्र आणि वाचः असे दोन शब्द असलेले आपण पाहिले. मृध्र हा शब्द मृध हिंसा करणे या धातुवरून आला असून त्याचा अर्थ हिंसित असा आहे. वाचः या शब्दाचा अर्थ कापलेल्या जिव्हा असलेले असा आहे. त्या

अर्थी ऋचातून मृध्रः असाही शब्द आहे. नाग द्विजिव्ह असतो. नागाशी संबंध दाखविण्यासाठी तापलेल्या सोन्याने जिभेला चिरा देण्याचा धार्मिक विधी आर्यांच्या शत्रूत होता असे दिसते. आर्यांचे शत्रू आणि सिंधुसंस्कृतीतील लोक यांचे ऐकात्म्य आपण इतरत्र सिद्ध केले आहे. सिंधुसंस्कृतितील लोकांच्या अनेक चालीरीती ऋच्यातील आर्यांच्या शत्रूत दिसतात. सिंधु संस्कृतीतील डोक्यावर शिंगे बांधण्याची चाल आर्यांच्या शत्रूत होती. ती चाल प्रचलीत हिंदु संस्कृतीतही आहे. हल्ली उत्तर हिंदुस्थानात अहिवंशी असे लोक आहेत. त्यांचा ' मथ्रा ' नावाच्या वंजाऱ्यातील श्रेष्ठ जातीशी संबंध आहे. या जातीत जिभेला तापलेल्या सोन्याने चिरा देण्याची चाल आहे. त्यासंबंधी इतरत्र[१] विस्ताराने लिहिले आहे. अहिवंशी म्हटले जाणारे, मृध्रा ( मथ्रा ) या वैदिक नावाने ओळखले जाणारे, जिभेला चिरा देण्याचा धार्मिक विधी असलेले लोक आजही भारतात आहेत. त्यावरुन सायणाने दिलेला मृध्रवाच म्हणजे कापलेल्या जिभा असलेले हा अर्थ बरोबर आहे. दास आणि दस्यु या दोन्ही शब्दांचा नागवंशीय असा अर्थ स्पष्ट आहे. तटबंदीच्या शहरांची संस्कृती त्यांचीच आहे. काश्मीर, पंजाब व उत्तर भारतात नागांच्या नावाची प्राचीन शहरे पुष्कळ आहेत. आर्यांच्या अगोदर भारतात नागवंशीय लोकांची संस्कृती होती असे दिसते. दास आणि दस्यू ह्या दोन्ही शब्दाचे मूळ अर्थ नाहीसे होऊन त्याना ' गुलाम ' आणि चोर असे विकृत अर्थ प्राप्त झाले. अज्ञानाने त्यांचे रूप वेदाच्या अभ्यासकानी किती विकृत केले ते आपण पाहिले. दास आणि दस्यू वास्तविक नागवंशीय तटबंदी खंदक व दरवाजे असलेल्या शहरात राहणारे फार समृद्ध आणि तत्कालीन उन्नतीच्या शिखरावर असलेले व्यापारी लोक होते. आपण दास आणि दस्यू या दोन नावाचा विचार केला. आता पणी या नावाचा विचार करू.

**पणी**

वरील उताऱ्यात मॅकडोनेलने पणीना भयंकर स्वरुपाचे हवेतील पिशाच्च ठरविले ते पाहिले. त्याला कारणे दास आणि दस्यूना पिशाच्च ठरविण्याची जी कारणे आहेत तीच. त्याचा आपण विचार केला आहे. पणी शब्दाचे निरुक्त अथवा अर्थ मॅकडोनेलला समजला नाही. कारण इन्द्राने त्याना ठार मारल्यामुळे ते कोणी भयंकर अतिमानुष शक्तीचे पिशाच्च असावे अशी त्याची समजूत झाली असलेली दिसते. पणी या शब्दाच्या अर्थात अथवा पणीसंबंधी ऋचात पणी हे तटबंदीच्या शहरात राहणारे सोने रुपे मौल्यवान दगड, उत्तम शेते, कालवे, गायी, घोडे व धान्याचे फार मोठे साठे असलेले दूरवर समुद्रावर व्यापार करणारे लिंग व मूर्तीपूजक लोक होते असे ऋचातून फार स्पष्ट असे असताना पणीसंबंधी विकृत कल्पना निर्माण होण्यास वर दर्शविलेलीच कारणे आहेत.

पणी हा शब्द संस्कृत, प्राकृत आणि देशी भाषेत पुर शब्दा इतकाच सुपरिचीत आहे. पणी हा शब्द ' पण व्यवहारे ' या धातुवरून आला असून मराठी भाषेत आपण पण्य इत्यादी अनेक शब्द पण धातुवरून आले आहेत. पणी या शब्दाचे निरुक्त यास्काने ' पणिर्वणिग्भवति, पणिः पणनात् वणिक् पण्यं नेनेक्ति । ' असे दिले आहे. सायणानेही पणयः वणिजः पणी म्हणजे व्यापारी असणे या बाबत त्याचे सिंधुलोकांचे साम्य आहे. पणी शब्दाचा संस्कृत पर्याय शब्द वणिक् व मराठी शब्द वाणी आहे. तो धात्वर्थावरूनही उघड दिसून येतो. असे असताना सूक्ष्मपद्धतीबद्दल अभिमान असलेल्या मॅकडोनेलला सूक्ष्मपद्धतीचा उपयोग करून पणी म्हणजे व्यापारी हा अर्थ कळला नाही. त्याने त्याचा अर्थ niggard असा केला. सूक्ष्म पद्धतीने त्याने तो अर्थ कोणत्या वेगळया धातूवरून सिद्ध केला व तो कोणत्या शब्दास जवळ आहे ते कळण्यास मार्ग नाही. सूक्ष्म पद्धतीच्या नावाखाली भलते सलते आपल्या कल्पनेप्रमाणे बऱ्याच महत्त्वाच्या शब्दांचे अर्थ पाश्चात्त्य लेखकानी लावले ते आपण वरील महत्त्वाच्या शब्दांच्या अर्थावरून पाहिले. पणी हा ऋचातील अत्यंत महत्त्वाचा शब्द आहे. इतर महत्त्वाच्या शब्दाप्रमाणे त्याचा अर्थ बरोबर कळला नाही तर ऋचांचा अर्थ कळणे अशक्य आहे. यास्क आणि सायण या दोघानाही

१. सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृति या पुस्तकात.



अनुक्रमणिका

पणी या शब्दाचा अर्थ व्यापारी असाच दिला आहे व ऋचावरूनही तोच अर्थ आहे असे दिसते.

वरील विवेचनावरून आपण हे पाहिले की ऋचांचे अर्थ करणारे भारतीय आणि पाश्चात्य विद्वान प्रायः ऋचातील वर्ण्य विषय विशेषतः त्यातील संग्राम निसर्गातील घडामोडींची वर्णने अथवा आर्यांच्या रानटी लोकांशी झालेल्या संग्रामाची वर्णने आहेत असे मानतात, व ऋचातील शब्दाचे अर्थही त्यास जुळतील असे करतात. ऋचातील वर्णने मेघ पाऊस इत्यादी निसर्गातील घडामोडी आहेत असे मानले म्हणजे ऋचातील वर्णने किती विकृत आणि चमत्कारिक होतात व ऋचा निरर्थक आणि भूत पिशाचाच्या गोष्टी बनतात ते आपण पाहिले. सूक्ष्म पद्धतीची घमेंड मारणारे व ज्यांची पुस्तके पाठ्यपुस्तके म्हणून आपण शिकतो व शिकवितो त्यांचीही हीच स्थिती; किंबहुना जास्त विकृत आणि केविलवाणी. त्यामुळे ऋचांचा अभ्यास म्हणजे भूत पिशाच्च्यांच्या युद्धाची वेडगळ वर्णने असेच ऋचांचे स्वरूप झाले आहे. कांही पाश्चात्त्य विद्वान ऋचात वर्णिलेले संग्राम आर्यांचे रानटी लोकाबरोबर झालेले संग्राम समजतात. हाही ऋचांबद्दलचा समज पहिल्या समजा इतकाच विकृत आणि चुकीचा आहे. त्यामुळेही ऋचांचे अर्थ बरोबर लागण्यास मदत होत नाही उलट ते जास्तच विकृत आणि चुकीचे होतात. ऋचांचा प्राकृतिक पद्धतीने अर्थ लावणारे ऋचातील आर्यांनी फोडलेली पुरे आणि शारदीय पुरे मेघ मानतात व त्यात राहणारे दास दस्यू आणि पणी म्हणून संबोधिलेले लोक हवेतील पिशाच्च समजतात तर आर्यांचे संग्राम रानटी लोकांशी झाले म्हणणारे पुरे सभोवती लाकडे लावलेले जमिनीतील छिद्र मानतात व त्यात राहणारे दास दस्यू आणि पणी कोणीतरी रानटी लोक मानतात. त्यामुळे ऋचात वर्णन असलेली तटबंदीची दारे असलेली सभोवार खंदक असलेली शहरे, त्यांचे सोने, द्रव्य, मौल्यवान दगड, उपभोग्य वस्तु, अन्नाचे साठे पशुधन, गायी, घोडे, उंट, हत्ती, शेळया, मेंढया, नौका, पाण्यावरून व्यापार, देव, धर्म, संस्कृती इत्यादी सर्वच गोष्टी अर्थ शून्य काल्पनिक आणि निरर्थक राहतात. ऋचा संबधीचे वरील दोन्हीही समज अत्यंत चुकीचे आणि विकृत आहेत. त्यामुळे ऋचांचा अभ्यास या चुकीच्या आणि विकृत दृष्टीकोनातून झाल्यामुळे ऋचांचे सर्व अर्थ चुकीचे आणि विकृत झाले आहेत.

## ऋचांच्या अभ्यासासाठी नवीन साधने

सिंधुसंस्कृतीचे, सिंध, पंजाब, काश्मीर, उत्तरप्रदेश राजस्थान, सौराष्ट्र आणि गुजराथ येथे विस्तृत प्रमाणावर उत्खनन होऊन सिंधुसंस्कृती नावाची तटबंदीच्या शहराची सलग संस्कृती उपलब्ध झाली. हरप्पा आणि मोहेंजादारो येथील उत्खननातील माहिती सर जॉन मार्शलने त्यावरील तज्ज्ञांच्या मतासुद्धा व नकाशे आणि चित्रासुद्धा चार मोठया ग्रंथात ग्रंथनिविष्ट करून ठेवली. त्यानंतर मॅके, व्हिलर व पिगट यानीही या संस्कृतीसंबंधी बरीच मोलाची माहिती मिळवून ग्रंथनिविष्ट करून ठेवली. त्या नंतर आर्कीआलाजीकल सर्व्हे ऑफ इन्डिया या संस्थेने उत्खनने करून फार मोलाच्या माहितीची भर घातली. अद्यापीही या संस्कृतीची उत्खनने होतच आहेत.

ही भारतातील श्रेष्ठ संस्कृती तटबंदीच्या शहरांची संस्कृती आहे. त्यातील शहरांना तटबंदी, दरवाजे व खंदक आहेत. त्यात राहणारे लोक समृद्ध व्यापारी असून त्यांचा समुद्रावरूनही फार लांबवर व्यापार होता. त्याची नौकानयनाची कला धक्के बांधण्याइतकी पुढे गेली होती. गुजराथेत लोथेल येथे उत्खनन होऊन धक्का उपलब्ध झाला आहे. या लोकांचा परदेशाशी व्यापाराबद्दलही पुरावा उपलब्ध झाला आहे. हा व्यापार परशियाच्या आखातावरून चाले. हे लोक समृद्ध असून त्यांच्या बहुतेक सर्व शहरातून धान्याची कोठारे उपलब्ध झाली. त्याना कालवे काढण्याची कला माहीत असून कालव्याच्या पाण्याचा उपयोग करून ते पुष्कळ पीक काढीत. त्याचे पशुधन विविध व विपुल होते. त्यांच्या जवळ सोने रुपे मौल्यवान दगड इत्यादी मौल्यवान वस्तूंचा विपुल साठा होता. ते लिंगपूजक व मूर्तीपूजक होते. त्यांचा विश्वरूप नावाचा तीन तोंडाचा देव होता. त्याना विविध कला व धंदे अवगत होते. त्यांच्यात जिभेला चिरा देण्याची व डोक्यावर शिंगे बांधण्याची चाल









होती. हे चित्र ऋचेतील आर्यांच्या शत्रूंच्या चित्राशी तंतोतंत जुळते.

वर निर्देशिलेल्या पाश्चात्य उत्खनन करणाऱ्या व लेखकांचेही शहराची संस्कृती आर्यपूर्व असून आर्यांनी तिचा विनाश केला असे मत होते. तशी गृहीतसमस्या धरून त्यानी मोलाचे वाङ्मयही निर्माण केले. परंतु मॅक्समुल्लरने आर्यांचा भारतात प्रवेशाचा ठरविलेला काळ बरोबर आहे असे मानल्यामुळे त्याना सिंधु संस्कृती ऋग्वेदास जोडता येत नव्हती. मॅक्स-मुल्लरने ठरविलेली कालगणनाबरोबर नाही हे भारतात आणि भारताबाहेर सापडलेल्या ऐतिहासिक पुराव्या-वरून प्रस्तुत लेखकाने इतरत्र दाखवून दिले आहे. ही कालगणना वरील पुराव्यावरून पुष्कळच मागे जाते आर्यांचा भारतात प्रवेशाचा काल इसवीसन पूर्व चौथ्या सहस्रकाच्या शेवटी म्हणजे इ. स पूर्व ३३०० ते ३२०० च्या दरम्यान असून आर्यांच्या सर्व प्रथम राज्य ब्रह्मावर्ताची स्थापना राजस्थानच्या वायव्येस सरस्वती व दृशद्वती या नद्यांच्या मध्यभागी इ. स. पूर्व ३१०२ मध्ये झाली. सिंधु संस्कृतीचा विनाश इ. स. पूर्व २७५० मध्ये झाला व ऋग्वेदात संकलित केलेल्या तृतीय श्रेणीच्या ऋचांची रचना तेथून अंदाजे तीन चार शतकाने म्हणजे इ. स. पूर्व २२५० च्या सुमारास सुरू होऊन पुढे बराच काळपर्यंत चालली.

सिंधुउत्खननातील पुराव्याची ऋचातील पुराव्याशी तुलना करून ऋचात वर्णिलेल्या आर्यांच्या शत्रूंचे ऐकात्म्य प्रस्तुत लेखकाने इतरत्र दाखविले आहे. त्यामुळे भारताचा प्राचीनतम वाङ्मयीन इतिहास ऋग्वेदास जोडला जातो व ऋचांच्या अभ्यासास मोलाची मदत होते. जे सिंधु उत्खननात डोळ्याने दिसते ते ऋग्वेदाच्या आवाजाने बोलके होते. ऋचातील वर्णने बरोबर आहेत की नाहीत ते उत्खननातील पुराव्यावरून ताडून पाहता येते व जे उत्खननात दिसते त्यासंबंधी जास्त माहिती ऋचात मिळते. असे सिंधु उत्खनन व ऋचा एकमेकास पूरक आहेत. एकाचा अभ्यास दुसऱ्याच्या अभ्यासा-शिवाय पूर्ण होत नाही.

ऋचांना ऐतिहासिक पार्श्वभूमी आहे. ऋचातून पूर्व आर्यांचा इतिहास आला आहे. तो कसा आला आहे व कसा पाहावा हे नीट समजावून घेतल्या-शिवाय व ऋचातील वर्णनाचे काय तंत्र आहे याचे सम्यक ज्ञान करून घेतल्याशिवाय ऋचांचा अभ्यास नुसत्या भाषेवरून, तर्कावरून अथवा संस्कृती बद्दलच्या मिथ्या ज्ञानावरून होणे शक्य नाही. ऋचांचा अभ्यास सम्यक् होण्यासाठी सिंधु संस्कृतीचा अभ्यास, ऐतिहा-सिक पार्श्वभूमीचे सम्यग् ज्ञान व ऋचातील वर्ण्य विषयाबद्दल नीट कल्पना या सर्व गोष्टींचे ज्ञान तसेच ऋचातून अवलंबिलेल्या तंत्राचे सम्यक् ज्ञान अभिनिवेश रहीत शास्त्रीय दृष्टीकोन, अर्थ लावण्याची सूक्ष्म पद्धती, वरील सर्व गोष्टी लक्षात घेऊन सायण भाष्याचा उपयोग या सर्व गोष्टींची प्राचुर्याने आवश्यकता आहे. या दृष्टीने अभ्यास केला असता ऋचा भारताच्या प्राचीन सामाजिक इतिहासाचे फार प्राचीन आणि मोलाचे साधन आहे हे दिसून येईल व त्या दृष्टीने ऋचांचा अभ्यास होण्याची फार मोठी गरज आहे. त्यामुळे प्रचलित भारतीय सामाजिक जीवनावर फार महत्त्वाचा प्रकाश पडेल.



अनुक्रमणिका

प्रि. डॉ. र. चिं. बडवे

# महाराष्ट्रातील जनतेशी हितगुज

अव्वल इंग्रजीच्या काळापासून विसाव्या शतकाच्या एक दोन दशकांपर्यंत देशातील विविध क्षेत्रात प्रथम श्रेणीचे जे नेते होऊन गेले त्यात महाराष्ट्रीयांचा वाटा फार मोठा होता. महात्मा जोतिराव फुले, विष्णु-शास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक, न्या. रानडे, नामदार गोखले, सुधारकाग्रणी आगरकर, पंडिता रमाबाई, भारताचार्य वैद्य, संस्कृतपंडित भांडारकर, न्या. तेलंग, वीर सावरकर इत्यादी नावे आजही भारताच्या विचारसंपदेत महान गणावी अशी आहेत. या नावांचा दबदबा नुसत्या महाराष्ट्रातच होता असे नव्हे तर अखिल भारतात होता. त्यांच्या कार्यामधून आजही स्फूर्ती मिळू शकते. या सर्व थोर व प्रभावशाली व्यक्तींमुळे भारतात व भारताबाहेरही महाराष्ट्रीयांना मोठ्या मानाचे स्थान प्राप्त झाले. बुद्धिवान, कर्तृत्व-वान व देशभक्त सुपुत्रांना जन्म देणारी भूमी म्हणून महाराष्ट्रास भारत ओळखू लागला. स्वार्थत्यागाच्या पायावर मोठमोठ्या खाजगी शिक्षणसंस्था स्थापन करुन तद्वारा देशोन्नतीच्या मार्गाची दीक्षा भारतीयांना देण्याच्या बाबतीत तत्कालीन महाराष्ट्रीयांची कामगिरी भारतात संस्मरणीय गणली जाऊ लागली. सिंधपासून विजापूर-धारवाडपर्यंत पसरलेल्या त्या-वेळच्या मुंबई प्रांतात उच्च शिक्षणाचा प्रसार सुरवातीला अन्य भागांपेक्षा मुंबई-पुणे या विभागातच मोठ्या प्रमाणावर झाल्याने व परिणामी लहानमोठ्या सरकारी नोकऱ्यात महाराष्ट्रीयांचा भरणा अन्य भाषिकांपेक्षा प्रमाणतः अधिक झाल्याने बुद्धिमत्ता व विद्वत्ता ही इतरांपेक्षा महाराष्ट्रीयात अधिक आहे अशी धारणा सर्वत्र पसरली. महाराष्ट्रीयांच्या कर्तब-गारीबद्दल इतरत्र आदरबुद्धी वाढीस लागली. इतर बौद्धिक क्षेत्रातही कमीजास्त प्रमाणात हाच अनुभव येऊ लागला. या सर्व घडामोडींचा स्वाभाविक परि-णाम म्हणजे महाराष्ट्र बुद्धिमान आहे, कर्तबगार आहे असा रास्त समज सर्वत्र पसरला. खुद्द महारा-ष्ट्रीयांनाही तसेच वाटू लागले. महाराष्ट्रातील लहान-थोर मंडळी या मुद्यावर जोर देऊ लागली. ही प्रथा आजतागायत अधिक उण्या प्रमाणात चालू आहे. हा समज सद्यस्थितीत कितपत खरा आहे, त्याला वस्तुस्थितीचा आधार किती अंशी सांपडतो, महाराष्ट्राबाहेर आज या बाबतीवरचे लोकमत काय आहे इत्यादी प्रश्नांची, प्रत्यक्षानुभवाच्या आधारे चिकित्सा करणे व त्यापासून महाराष्ट्रीयांनी कोणता बोध घेणे इष्ट आहे याचा आत्मीयतेने शोध घेणे हे या लेखाचे मुख्य प्रयोजन आहे.

### महाराष्ट्र बुद्धिमान आहे ?

सुरवातीलाच हे स्पष्ट करणे जरूर आहे की वर आलेल्या पुराव्याच्या सत्यतेबद्दल माझ्या मनात यत्किंचितही शंका नाही. उपर्युक्त व्यक्तींची बुद्धिमत्ता व कर्तबगारी वादातीत आहे व तसे अन्य प्रान्तीयही मानतात याबद्दलही दुमत होण्याचा संभव नाही. सोळा सतरा वर्षांपूर्वी मी नोकरीनिमित्त प्रथमच गुजराथेत पाऊल ठेवले. त्यावेळच्या गुजराथी समाजा-तील वयस्क मंडळीत मला हा समज आढळून आला होता व महाराष्ट्रीय लोक बुद्धिमान व कर्तबगार असल्याचे उद्‌गार ऐकण्याचे सद्भाग्यही मला अनेकवार लाभले होते. परंतु आपला मुख्य प्रश्न तो नसून आज वस्तुस्थिती काय आहे हे शोधण्याचा आहे व तोही डोळे उघडे ठेवून कठोर व निःपक्षपाती वृत्तीने. अशा प्रकारच्या आत्मसंशोधनाद्वारा आपल्या पात्रतेचे प्रत्यक्ष चित्र दृष्टीसमोर साकार झाले तर त्यातील उणीवा लक्षात भरतील व त्या दूर करण्याच्या मार्गाचा विचार डोक्यात घोळू लागेल. अशा प्रकारचे विचार तुरळक व त्रोटक स्वरूपात क्वचित कानावर येत असले तरी एकंदरीने पाहता उपर्युक्त समजाने महाराष्ट्रीयांच्या मनात पक्के घर केलेले आहे असेच सर्वसाधारणपणे दिसून येते यात शंका नाही. याला प्रत्यक्षाप्रत्यक्ष अनुभवाचा आधार मिळाला तर त्यासारखी आनंदाची गोष्ट नाही. परंतु न मिळाला तर महाराष्ट्राने त्याची गंभीरपणे दखल घेणे सद्यः-स्थितीत अतिशय जरूरीचे आहे याबद्दल वाद होऊ नये.

शास्त्रीय दृष्टिकोनातून पाहता कोणत्याही समाजा-बद्दल तो बुद्धिमान आहे, भावनाप्रधान आहे, संपत्ति-



अनुक्रमणिका

पूजक आहे अशी विधाने निरर्थकच होत. कारण इतकेच की प्रत्येक समाजात सर्वच प्रकारची माणसे कमीजास्त प्रमाणात विखुरलेली असतात. बुद्धी, भावनाशीलता, कर्तबगारी, मनःपूर्वक काम करण्याची तळमळ वा वृत्ती, अभ्यासूपणा, संशोधनक्षमता, सृजनशीलता, धाडस व धडाडी, प्रामाणिकता इत्यादी गुणांचा अथवा गुन्हेगारीवृत्ती, कठोरपणा, बुद्धिमांद्य, आळशीपणा, भीरुता, इत्यादी दुर्गुणांचा सुकाळ यांचा कोणत्याही समाजाला मक्ता मिळालेला नाही. सर्वच समाजात हे गुण वा दुर्गुण अधिक उण्या प्रमाणात आढळून येतात. स्वाभाविकपणेच अमुक समाज असा असा आहे अशी विधाने व्यक्ती वा समष्टीचा अहंकार संतोषवीत असली तरी शास्त्रीय दृष्टीने ती स्वीकार्य मानता येत नाहीत. फक्त व्यावहारिक दृष्टी स्वीकारून विचार केला तर मात्र या विधानांचा अर्थ असा होऊ शकेल की ज्या प्रमाणात बुद्धिमानांची संख्या इतर समाजांपेक्षा तुलनेने अधिक तो समाज अधिक बुद्धिमान. इतर गुण वा दुर्गुणांबद्दलही असेच म्हणता येईल. याचा अर्थ असा की कोणत्याही समाजासंबंधीच्या या प्रकारच्या सर्व विधानांमध्ये तुलना अभिप्रेत असते. महाराष्ट्र बुद्धिमान आहे यात इतर समाजांपेक्षा अधिक हा अर्थ अभिप्रेत असतो. महाराष्ट्र प्रामाणिक आहे, त्यागी आहे म्हणजे इतर समाजांपेक्षा तो अधिक प्रामाणिक आहे अथवा अधिक त्यागी आहे असे वक्त्याला सूचित करावयाचे असते. असा तुलनात्मक दृष्टिबिंदु नसेल तर ही व्यावहारिक भूमिकेवरून केलेली विधानेही अर्थहीनच ठरतील. हे सर्व लक्षात घेऊन 'महाराष्ट्र बुद्धिमान आहे' या विधानाची वस्तुनिष्ठ पुराव्याच्या मागोव्याने व आत्मसंतोषी वृत्तीच्या आहारी न जाता, चिकित्सा व्हावयास हवी.

निरनिराळ्या समाजांची क्षेत्रीय पहाणी करून संख्याशास्त्राच्या आधाराने आकडेवारी वा आलेख मांडल्याशिवाय वस्तुनिष्ठ पुरावा कसा काय हाती लागणार अशी शंका उत्पन्न होण्याचा संभव आहे. परंतु वर उल्लेखल्याप्रमाणे शास्त्रीय कसोटीस उतरणारा काटेकोर पुरावा तयार करण्यास क्षेत्रीय पहाणीची जरूर असली तरी व्यावहारिक भूमिका पत्करल्यास सारासार बुद्धीला पटेल अशा पुराव्यासाठी समाजांचे व्यवस्थित व पूर्वग्रहविरहित निरीक्षण पुरेसे उपयुक्त ठरू शकेल असे म्हणण्यास हरकत दिसत नाही. म्हणून येथे याच पद्धतीचा अंगिकार करून हाती काय लागते ते पहावयाचे आहे.

'महाराष्ट्र बुद्धिमान आहे' या विधानातील 'महाराष्ट्र' व 'बुद्धिमान' या शब्दांचा अर्थही स्पष्टपणे लक्षात घेणे जरूर आहे. महाराष्ट्र म्हणजे मराठी भाषिक (मराठी ही स्वभाषा असलेला) समाज. महाराष्ट्राच्या भौगोलिक सीमेत राहणारा समाज हा अर्थ हे वाक्य उच्चारणाऱ्यांना अभिप्रेत नसतो हे मुद्दाम लक्षात ठेवावयास हवे; कारण असा अर्थ घेतल्यास 'महाराष्ट्रातील गुजराथी' (अथवा कानडी, मारवाडी वगैरे) असा शब्दप्रयोग आत्मविरोधी अतएव अर्थहीन ठरेल. दुसरा शब्द 'बुद्धिमान'. याचा अर्थ निश्चित करणे हे मात्र अवघड काम आहे. तरी पण व्यावहारिकदृष्ट्या बुद्धिमत्तेच्या काही कसोट्या सांगता येतील. प्रत्यक्ष बुद्धी म्हणजे काय हे जरी सांगता आले नाही तरी परिणामांवरून तिच्या अस्तित्वाचा व स्वरूपाचा ठोकळ मानाने बोध होऊ शकेल. उदाहरणार्थ, महाराष्ट्रातील विद्यापीठांचा दर्जा व समाजातील सुशिक्षितांचे प्रमाण, संशोधनाची प्रगल्भता, कल्पकतेची भरारी, सृजनशीलता, समाजात निर्माण होणाऱ्या ग्रंथांचा वा नियतकालिकांचा कस, अन्य समाजावर पडू शकणारा प्रभाव, नेतृत्वाचे देशातील वजन, सामाजिक, राजकीय वा अन्य क्षेत्रात कार्य करणाऱ्या संस्थांची व व्यक्तींची संख्या आणि त्यांच्या कार्याचे स्वरूप, विविधता आणि दर्जा, देशाच्या आर्थिक वा इतर क्षेत्रात उच्च स्थानांवर काम करणाऱ्यांमध्ये या समाजाचे प्रमाण, आय्. ए. एस्. व तत्सम परीक्षात या समाजाचे प्रमाण या व अशा अनेक कसोट्यांचा उपयोग करून महत्त्वाचे निष्कर्ष काढता येतील. तसे केल्यास आपल्याला कोणते चित्र दिसते हे पहाण्यासारखे आहे. विस्तारभयास्तव येथे फक्त काही निवडक कसोट्यांचाच मागोवा घेऊन निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न केला आहे.

### शिक्षितांचे प्रमाण व दर्जा

बंगाल, मद्रास वगैरे प्रान्तात इंग्रजी शिक्षणाची सुरुवात महाराष्ट्राच्या अगोदर झाल्यामुळे त्यांच्या








मानाने महाराष्ट्र शिक्षणात सुरुवातीपासूनच मागे आहे हे सर्वजण जाणतातच. केरळही महाराष्ट्राच्या बराच पुढे आहे. पूर्वीच्या चतुर्भाषी मुंबई प्रांतात सिंध, गुजराथ व कर्नाटक या विभागांपेक्षा महाराष्ट्रात शिक्षितांचे प्रमाण अधिक होते हे खरे असले तरी स्वातंत्र्योत्तर काळात ही परिस्थिती बहुतांशी पालटली आहे. हे महाराष्ट्रीयांच्या यावे तितके लक्षात आलेले दिसत नाही. सिंध, पाकिस्तानात गेल्याने त्याचा विचार येथे अप्रस्तुत होय. गुजराथ व कर्नाटक यांचाच विचार येथे मुख्यतः कर्तव्य आहे. दुसऱ्या महायुद्धापर्यंतची निरनिराळ्या शहरांची परिस्थिती विचारात घेता तत्कालीन मुंबई प्रांतात पुणे शहराने शिक्षणाच्या बाबतीत मुंबई व अहमदाबाद यांनाही मागे टाकले होते. कर्नाटकात तर अशी मोठी शहरेच नव्हती. महायुद्धोत्तर कालात मात्र परिस्थिती झपाट्याने बदलली. गुजराथ व कर्नाटकाने शिक्षणाचे महत्त्व पुरेपूर ओळखले. परिणामी, आज शिक्षण प्रसाराच्या बाबतीत गुजराथ नक्कीच व कर्नाटक बहुधा संख्येच्या दृष्टीने महाराष्ट्राच्या पुढे आहेत. वर्तमानपत्रे, नियतकालिके, ग्रंथनिर्मिती, स्वभाषेची सेवा याही बाबतीत निदान गुजराथ तरी आघाडीवर आहे. एम्. ए. व एम्. एस्‌सी पर्यंत गुजराथी माध्यम केल्याने महाविद्यालयीन विषयांवर शेकडो ग्रंथ गुजराथीत प्रसिद्ध झाले आहेत व ही क्रिया सतत चालू आहे.

गुणांच्या बाबतीतही महाराष्ट्रात भूषणास्पद अशी स्थिती आहे असे दिसत नाही. गुजराथी माध्यमामुळे गुजराथी विद्यार्थी इंग्रजीच्या बाबतीत कच्चे रहातात हे खरे असले तरी ते परीक्षेच्या काळापर्यंतच. त्यामुळे त्यांना गुजराथेतच नव्हे तर महाराष्ट्रातही चांगल्या व सामान्य नोकऱ्या मिळण्यास विशेष अडचण पडेल असे वाटत नाही. सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास आपल्या सहज लक्षात येऊ शकेल की त्यांना बहुधा महाराष्ट्रीयांपेक्षा तुलनेने अधिक चांगल्या पगाराच्या वा अन्य नोकऱ्या अधिक प्रमाणात उपलब्ध होतात. मुंबई हे सर्व नोकऱ्यांचे माहेरघर असल्याने तिचे उदाहरण अभ्यासण्याजोगे आहे. तेथे गुजराथी समाज फक्त १८ टक्के असतानाही त्या समाजाची मंडळी वकिली, डॉक्टरकी, स्थापत्यविद्या, हिशेबतपासनिशी, व्यवस्थापकी, उद्योगधंद्यातील महत्त्वाच्या जागा, व्यापार इ. व्यवसायात सुरुवातीपासून महाराष्ट्रीयांच्या पुढेच आहेत. घाऊक व्यापारात तर ते सर्वच महाराष्ट्रातील सूत्रे आपल्या हातात ठेवून आहेत. युद्धकालापासून दक्षिण भारतीयांनीही महाराष्ट्रीयांच्या पुढे मोठी आघाडी मारली आहे. थोडक्यात म्हणजे नोकरी व व्यवसाय या बाबतीत महाराष्ट्रीय माणसे खुद्द महाराष्ट्रातही अन्य प्रांतीयांशी यशस्वी स्पर्धा करू शकत नाहीत. म्हणजेच महाराष्ट्रातील सुशिक्षित हे गुणांनी इतरांपेक्षा ठरले तर हिणकसच ठरतील. हाच प्रकार अखिल भारतीय स्पर्धात्मक परीक्षांच्या बाबतीत पहावयास मिळतो. त्यात महाराष्ट्रीय मंडळी फारच अल्प प्रमाणात उत्तीर्ण होतात ही वस्तुस्थिती महशूर आहे. स्वाभाविकपणेच अखिल भारतीय स्वरूपाच्या नोकऱ्यात (की ज्यात उच्च दर्जाची सत्ता व संपत्ती केन्द्रित झालेली) महाराष्ट्रीयांच्या संख्येत घट होत आहे, इतकी की खुद्द पुण्याच्या परिसरातील सरकारी व खाजगी उद्योगधंद्यात महाराष्ट्रीयांची संख्या उच्च श्रेणीच्या नोकऱ्यात नाममात्र आहे व तशी वर्तमानपत्रातून ओरडही चालू आहे. या घडामोडीच्या तळाशी वशिलेबाजीचा काहीतरी भाग असेलच, नाही असे नाही. परंतु १०० टक्के वशिलेबाजीच आहे असे मानून आत्मसमाधान व समर्थन करून घेणे ही गर्हणीय स्वरूपाची आत्मवंचना होय. वशिलेबाजीच्या नावाने खडे फोडीत राहण्याने काहीच साधणार नाही. वृत्तपत्रे व नियतकालिकांच्या बाबतीतही अनुभव फारसा निराळा नाही. महाराष्ट्रात व महाराष्ट्रीयात मराठी वृत्तपत्रे खपतात यात विशेष भूषणास्पद काहीच नाही. भारतीय तोलाची व भारतावर छाप पाडू शकतील अशी वृत्तपत्रे चालविण्याची कुवत सिद्ध केलेले महाराष्ट्रीय किती आहेत हा खरा प्रश्न आहे. बहुधा नाहीतच असेच याचे उत्तर आहे. आपल्याला पसंत असो वा नसो, स्वातंत्र्यपूर्व काळातच नव्हे तर स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या आजपर्यंतच्या काळात इंग्रजी हीच सर्व क्षेत्रात व्यावहारिकदृष्टच्या अखिल भारतीय व आंतरप्रादेशीय भाषेचा बहुमान भोगीत आहे. महाराष्ट्राचा आर्थिक, राजकीय वा

अन्य दृष्टिकोन महाराष्ट्राबाहेरील भारतीय जनतेपुढे इंग्रजीत (अथवा हिंदीत) तर्कशुद्धपणे मांडणारी वृत्तपत्रे किती आहेत ? किंवा इतरांनी चालविलेल्या पत्रात महाराष्ट्रीयांना आपली बाजू मांडण्यास कितपत यश येते ? महाराष्ट्रात प्रसिद्ध होणारी इंग्रजी वृत्तपत्रेही महाराष्ट्रीयेतरांच्याच हाती आहेत. व प्रवाद असा आहे की ही पत्रे महाराष्ट्राच्या हिताची चिंता करीत नाहीत. पण त्यांना या बाबतीत दोष देण्यात अर्थ काय ? आपण आपली स्वतःची वकिली करू शकत नाही ही वस्तुस्थिति इतर आपली वकिली करीत नाही या बालिश ओरडीमुळे कशी झाकली जाईल ? सरकारी नोकऱ्यात वशिलेबाजी आहे असे वादासाठी गृहीत धरले तरी वृत्तपत्रासारख्या स्वतंत्र व्यवसायातही आपल्याला काही कर्तबगारी दाखवून विशेष स्थान प्राप्त करून घेता आले नाही त्याचे काय ? मराठी भाषेवरील प्रगाढ प्रेमामुळे आमचे परक्या भाषेवर प्रभुत्व मिळविण्याकडे लक्ष गेले नाही हे म्हणणे म्हणजे निव्वळ 'द्राक्षे आंबट आहेत' या वृत्तीचे प्रदर्शन होय. कारण मराठी भाषेची आमची सेवाही इतर भाषीयांच्या मानाने डोळचात भरण्यासारखी आहे असे आढळून येत नाही. बरे, उच्च नोकऱ्यांचा विचार जरा बाजूला ठेवून कारकुनी, टंकलेखन, लघुलेखन, कार्यालयीन काम इत्यादी सामान्य नोकऱ्यांचा विचार केला तरीही प्रत्यक्ष कामाच्या दृष्टीने महाराष्ट्रीय माणसांना इतर प्रांतीयांशी विशेषतः दाक्षिणात्यांशी स्पर्धा करणे अवघड जाते हा अनुभव आहे. या जागांसाठी निवड करताना ज्यावेळी फक्त गुणांचा विचार केला जातो त्यावेळी इतरांची पसंती करण्याकडे उच्च अधिकाऱ्यांचा कल असतो याचे इंगित आपण नीट समजून घेतले पाहिजे. निव्वळ कुचेष्टेने तात्कालिक मानसिक समाधान कदाचित मिळू शकले तरी नोकऱ्यांचा प्रत्यक्ष लाभ इतरांनाच मिळतो हे आपल्या केव्हा लक्षात येणार ? व त्यासाठी जरूर असलेल्या गुणांची जोपासना आपण केव्हा करणार ?

शिक्षणसंस्था काढून त्या यशस्वीपणे व स्वार्थत्यागाने चालविण्यात इतरांपेक्षा आपला हातखंडा अधिक आहे असेही ठामपणे सांगणे कठीण आहे. पुण्यातील तीन चार संस्था फार पूर्वीपासून आपण चालविल्या असून एक प्रकारे आदर्श निर्माण केला आहे हे खरेच आहे. परंतु मुख्य प्रश्न तदनंतर काय हा आहे. आज खेडोपाडी शाळाकॉलेजे देशात सर्वत्रच उघडली जात असल्याने आपण स्वतःचीच पाठ थोपटून घेण्यात विशेष स्वारस्य नाही. मी तर उलट असे म्हणतो की सीमेवरील ज्या भागांवर आपण आज भाषेच्या दृष्टीने हक्क सांगत आहोत, त्या ठिकाणी आपण या कार्यात मागे पडलो आहोत. बेळगाव, कारवार निपाणी येथील शिक्षणसंस्था कोणी चालविल्या आहेत ? आपण जर बहुसंख्य आहोत व शिक्षणसंस्था चालविण्यात जर आपला हातखंडा आहे तर या भागात आपल्याला ते का जमले नाही ? राणी पार्वतीदेवी कॉलेजकडे कदाचित् कोणी बोट दाखवितील. परंतु ही फक्त एकमेव संस्था महाराष्ट्रीयांची आहे. त्या संस्थेच्या प्रगतीचा इतिहास एकदा डोळचाखालून घालावा इतके इथे म्हटले म्हणजे पुरे.

## आर्थिक क्षेत्र

या क्षेत्राचे स्थूलमानाने तीन भाग कल्पिता येतील: (१) शेती (२) लहानमोठे उद्योगधंदे व (३) नोकऱ्या. या तिन्ही बाबतीत महाराष्ट्रीयांची कर्तबगारी काय आहे ?

स्वातंत्र्योत्तर काळात 'कसेल त्याची जमीन' हे उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने केलेल्या कायद्यांपूर्वी महाराष्ट्रातील हजारो नव्हे लाखो एकर जमीन गुजराथी व मारवाडी सावकारांकडे गहाण पडलेली होती, अथवा त्यांच्या मालकीची झालेली होती. आपला खेडचातील समाज या लोकांचा आर्थिक दृष्टचा गुलाम बनला होता. उपर्युक्त कायदे झाले नसते तर आणखी काही वर्षात सबंध महाराष्ट्रच गहाण पडला असता असे विचार मनाला चाटून जातात. संपन्नतेच्या दृष्टीने पाहिले तर शेती या व्यवसायाचे स्थान फारच निकृष्ट आहे. जेमतेम कुटुंबाला वर्षभर चरितार्थ चालविता आला म्हणजे मिळविली. संपन्न शेतकरी ही चीज एकंदरीने दुर्मिळच. गेल्या काही वर्षात मात्र यात फरक पडत आहे. लहान उद्योगधंदे हे मुख्यतः स्थानिक स्वरूपाचे असतात. भारतात ते इतरत्र जसे चालू आहेत तसेच ते महाराष्ट्रातही

चालू आहेत. या उद्योगधंद्याद्वारे आर्थिक संपन्नता क्वचितच प्राप्त होते व तीही मर्यादित प्रमाणात. यात नोकऱ्यांचे प्रमाणही अत्यल्पच व त्याचा देशावरील प्रभावही विशेष नसतो. यामुळे खरे महत्त्व मोठ्या उद्योगधंद्यांचे अथवा कारखान्यांचेच होय. असे किती कारखाने महाराष्ट्रीयांनी चालविले आहेत ? किर्लोस्कर समूह, वैद्यांचा रबर कारखाना, गरवारे नायलॉन्स, अगदी अलीकडच्या काळात स्थापन झालेले काही सहकारी वा इतर साखर कारखाने आदी काही थोडेफार मोठे कारखाने सोडले तर महाराष्ट्रातील इतर सर्व मोठमोठ्या कारखान्यांची सूत्रे इतरांच्या हाती असल्याचे दिसून येते. आता .यात तर वशिलेबाजीचा प्रश्न नाही ना? मग ही दशा का? बरे महाराष्ट्रीयांनी महाराष्ट्राबाहेर पराक्रम चालविले आहेत असे म्हणावे तर त्यालाही वस्तुस्थितीचा आधार फारसा मिळत नाही. मोरवीचे श्री. गणपुले, बिलीमोराचे श्री. सरदेसाई, हरिहर व म्हैसूरचे श्री. किर्लोस्कर, सोनगड कागद कारखान्यांचे श्री. पारखे अशासारखी काही मोजकी नावेच नजरेसमोर येतात. बाकी सर्व खडखडाट. महाराष्ट्राचे दारिद्र्यच याला कारणीभूत आहे हे म्हणणे म्हणजे 'नाचता येईना तर आंगण वाकडे' या वृत्तीचाच नमुना होय. उद्योगधंद्यांचा विकास घडवून आणल्याशिवाय दारिद्र्य हटणार कसे हा प्रश्न स्वतःला विचारला पाहिजे व त्याचे उत्तर कृतीने शोधले पाहिजे; नहून हे दुष्टचक्र महाराष्ट्राची मानगूट सोडणे कठीण. दारिद्र्य **काही अंशी** जबाबदार आहे हे एकवेळ मान्य केले तरी ते सर्वस्वी जबाबदार आहे असे मानणे कठीण आहे. धडाडीचा व स्वतंत्र उद्योग स्थापन करण्याच्या महत्त्वाकांक्षेचा अभाव, तसेच नोकऱ्यांची चटक, स्वकीयांचा द्वेष, परधार्जिणेपणा इत्यादी गुण हे या आर्थिक दुर्दशेच्या बुडाशी आहेत. संयुक्त भांडवलाच्या मंडळ्या ( Joint Stock Companies ) स्थापण्याची सोय उपलब्ध असता केवळ दारिद्र्याच्या नावाखाली आपली नालायकी किती दिवस झाकता येईल ? मुख्य कारण असेच दिसते की गेल्या १०० वर्षांपासून आम्हाला तयार नोकऱ्यांचीच मुख्यतः चटक लागल्याने इतरांनी येथे येऊन कारखाने काढावेत व आम्हाला नोकऱ्या द्याव्यात हीच वृत्ती आमचा स्थायीभाव बनलेली आहे. महाराष्ट्रात स्थापन झालेल्या कारखान्यात स्थानिक लोकांना नोकऱ्यांच्या बाबतीत अग्रहक्क मिळाला पाहिजे ही मागणी कित्येक वेळा कानी येते हे ठीक आहे, परंतु कारखानदाराला आपल्या कारखान्यातील वरिष्ठ अधिकारी आपल्या विश्वासाचे असावेत असे वाटते तर त्याला दोष देऊन काय साधणार ? परिणामतः कारकुनी व मजुरी हीच मुख्यतः आपल्या वाट्याला आली तर ते काही अंशी तरी स्वाभाविकच म्हटले पाहिजे. मुंबईसारख्या शहरात घरभाड्याच्या उत्पन्नासाठी बांधलेल्या चाळींचाच फक्त विचार केला तरी त्यातही इतरांचेच घोडे पुढे दिसते. प्लॉटस् घेऊन घरे बांधणे ही आपली कामे नव्हत. अशी मुंबईतील बहुसंख्य महाराष्ट्रीयांच्या मनाची धारणा आहे. इतरांनी मात्र मुंबईतच नव्हे तर पुणे , नाशिक, जळगाव इत्यादी शहरातही लहानमोठ्या स्थावर इस्टेटी स्थापून नियमित उत्पन्नाची सोय करण्याचा पायंडा पाडला आहे. जमिनी विकत घेऊन व त्यांचे प्लॉटस् पाडून विकणे हा धंदा सध्या मोठ्या तेजीत आहे. परंतु त्यातही कमीजास्त प्रमाणात इतरांचाच पुढाकार असल्याचे तपासाअंती ध्यानात येईल.

उद्योगधंद्यांना प्रचंड भांडवल लागते ही निदान सबब तरी आहे. दुकाने काढण्यास तर छोटे भांडवल पुरते ना ? गुजराथी व मारवाडी लोकांना तर याचीही फारशी गरज नसते. शेपन्नास रु. च्या भांडवलावर ते दुकाने उभारू शकतात. मग आम्हालाच ते का जमू नये ? कारण हेच की शिक्षित माणूस प्रथम नोकरी शोधणेच पसंत करतो. ती नाहीच मिळाली व बेकार रहाण्याचाच प्रसंग नशिबी आला तर नाईलाजास्तवच दुकान काढण्याचा विचार त्याच्या मनात येतो. खरे पाहता दुकान म्हणजे वंशपरंपरा चालू शकणारी नोकरी आहे हे आमच्या लक्षातच येत नाही. अगदी अलीकडच्या काळात परिस्थितीच्या दबावामुळे महाराष्ट्रीयांचे लक्ष इकडे जात आहे ही त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट होय.

आर्थिक संपन्नतेच्या अभावी महाराष्ट्रातील विविध संस्थांना मोठमोठ्या देणग्या देणाऱ्यात












इतरांचाच वाटा अधिक आहे व म्हणून त्या त्या संस्थांवर प्रभुत्वही त्यांचेच आहे. इतकेच नव्हे तर स्थानिक स्वराज्यसंस्थातही अनेक ठिकाणी सूत्रचालकत्व इतरांच्याच हाती आहे. महाराष्ट्राबाहेरील अशा संस्थात महाराष्ट्रीयांना नाममात्र तरी स्थान आहे की नाही याची शंका आहे. या सर्व दयनीय व शोचनीय अवस्थेत आपल्या दारिद्र्याबरोबर आपले स्वभावदोषही मोठ्या प्रमाणात कारणीभूत आहेत हे मुद्दाम लक्षात ठेवणे आवश्यक आहे. या स्वभाव दोषासंबंधीचे माझे महाराष्ट्रातील व विशेषतः महाराष्ट्राबाहेरील प्रत्यक्ष अनुभव इतके विदारक आहेत की ते सांगितल्यास अनेकांना खरेही वाटणार नाहीत. खाजगी गोष्टी प्रकट करण्यासाठी या लेखाचा माध्यम म्हणून उपयोग करणे इष्ट नसल्यानेच केवळ त्यांचा उल्लेख येथे टाळीत आहे.

## राजकीय क्षेत्र

टिळक, गोखले, रानडे यांच्या कर्तृत्वाचा सूर्य अखिल भारतात आपल्या प्रखर तेजाने तळपत असताना भारतीय राजकारणात महाराष्ट्राचे स्थान अतिशय श्रेष्ठ होते व महाराष्ट्राच्या शब्दाला मोठी किंमत होती हे त्रिवार सत्य होय. परंतु पूर्वजांच्या कर्तबगारीची शिदोरी किती दिवस पुरणार ? असहकाराचा प्रस्ताव महाराष्ट्रात कोणालाही पसंत पडणार नाही असे राष्ट्रीय सभेच्या महासभेत कै. तात्यासाहेब केळकरांनी सांगताच ‘ काँग्रेस ही काही महाराष्ट्राची वटिक नाही ’ असा रोकठोक जबाब कै. मोतीलाल नेहरूंनी दिला व महाराष्ट्रीय प्रतिनिधींनी तो मुकाट्याने गिळला. लो. टिळक त्यावेळी ह्यात असते तर असा जबाब मिळताच ना, व यदा कदाचित मिळता तर तेथे फार मोठे वादळ उठले असते. लो. टिळकांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्राच्या शब्दाची किंमत भारतीय राजकारणात उत्तरोत्तर घसरतच गेलेली दिसते. महाराष्ट्रात मातबर गणल्या गेलेल्यांनाही बाहेर फारशी किंमत असल्याचे आढळून येत नाही. येथे हे स्पष्टपणे समजून घ्यावयास पाहिजे की किंमतीचे अवमूलन झाले आहे की नाही याचा निर्णय अन्य लोक काय बोलतात त्याच्या आधाराने करण्याचा नसून ते कृती काय करतात त्याच्या आधारे ठरविण्याचा आहे. भाषावार राज्यांची स्थापना होण्याच्या प्रश्नात महाराष्ट्राची किती कुतरओढ झाली ते लक्षात घेता हा मुद्दा चटकन ध्यानात येईल. याच संदर्भात दुसरीही एक गोष्ट लक्षात घेण्याजोगी आहे. ती अशी की वर एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे महाराष्ट्रीय बुद्धिजीवी वर्गाला पूर्वीपासून नोकरीची चटक लागली असल्याने व महाराष्ट्रात शिक्षणाचा प्रसार जवळजवळ दुसऱ्या महायुद्धापर्यंत शेजारील अन्य भाषिकांपेक्षा अधिक असल्याने गुजराथ व कर्नाटक भागात सरकारी व इतर नोकऱ्यांच्या निमित्ताने अनेक महाराष्ट्रीय लोक दिसून येत. भाषावारीची भाषा सुरू झाल्यावर मात्र त्यांच्या संख्येला ओहोटी लागली. जे अगोदरच गेले होते त्यांना अर्धचंद्र मिळाला असे नव्हे तर तेच सोडून जाऊ लागले. व नवीन आवक मंदावली. मी गुजराथेत गेलो त्यावेळी आमच्या कॉलेजात अर्ध्याहून अधिक प्राध्यापक महाराष्ट्रीय होते. दोन तीन वर्षापर्यंत हे टिकले. नंतर मात्र आवक झपाट्याने बंद होऊ लागली. गेली ४।५ वर्षे तर मी एकटाच होतो. हीच स्थिती कमीजास्त प्रमाणात सर्वच कार्यालयांबाबत होती. या घटनेचा अर्थ काय होतो ? जर नोकऱ्यांवर आपली उडी होती तर भाषावारीचे लक्ष्य साध्य करतांना या लाभाला निदान आपल्या अदूरदर्शी धोरणाने धक्का पोचणार नाही इतकी काळजी घेण्याचाही विवेक आपल्यामध्ये राहिला नाही. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झाला पाहिजे. ही मागणी सहज समजू शकते. परंतु साहित्य संमेलनाचे अधिवेशन मुद्दाम अहमदाबादला भरवून तेथे गुजराथी जनतेला डिवचण्यासाठी तसा प्रस्ताव करण्याची काय जरूर होती ? कोणी असे म्हणतील की ही आवक बंद होण्याची इतरही कारणे आहेत. आहेत ना. नाही कोण म्हणतो ? परंतु विवेक सुटल्याने पायावर धोंडा पाडून घेण्याचा प्रसंग उद्भवला हेही अत्यंत महत्त्वाचे कारण आहे हे विसरण्यात अर्थ काय ? मुद्दा असा की राजकीय क्षेत्रात आज तरी महाराष्ट्राच्या शब्दाला बाहेर म्हणण्यासारखी काही किंमत आहे असे दिसत नाही. महाराष्ट्र बुद्धिमान आहे याचे हे चिन्ह नव्हे.

सार्वजनिक क्षेत्रात कार्य करणाऱ्यांना ही गोष्ट जाणवते व बोचते. परंतु त्याची मूळ कारणे मुख्यतः












आपल्यातीलच काही दोषात आहेत की काय या दृष्टीने विचार न करता दुसऱ्यांच्या डोक्यावर खापर फोडून मोकळे होण्याचीच वृत्ती येथेही दिसून येते. उदाहरणार्थ बृहन्महाराष्ट्रीयांच्या समस्या या विषयावर १।२ वर्षांपूर्वी वसंत व्याख्यानमालेत झालेल्या व्याख्यानाचे वेळी पुण्यातील एका प्रसिद्ध व्यक्तीने कोणताही पुरावा न देता पुढील आशयाचे वक्तव्य गाजविले —

'मी नुकताच दिल्लीहून परत आलो आहे. तेथील आठपंधरा दिवसांच्या वास्तव्यात मला असे आढळून आले की दिल्लीत महाराष्ट्राविषयी आकस आहे' वगैरे. मला तरी या वाक्याचा अर्थबोध झाला नाही. दिल्लीत म्हणजे कुठे व आकस म्हणजे काय आहे हे स्पष्ट करण्याची त्यांना जरूर वाटली नाही व श्रोत्यांनाही त्याची गरज भासली नाही. द्विभाषी मुंबई राज्यात महाराष्ट्रीयांची संख्या गुजराथ्यांपेक्षा जवळजवळ दुप्पट असताही महाराष्ट्रीयांना गुजराथ्यांची भीती वाटली याचे मला फारच आश्चर्य वाटत असे. या भीतीचे कारण असे सांगण्यात येत असे की गुजराथी सर्व एकमुखाने बोलतात व महाराष्ट्रीय मात्र अनेक मुखांनी बोलतात. या दुहीचा फायदा गुजराथी लोक पुरेपूर उपटतात. या कारणाला वास्तवतेचा आधार कितपत आहे हे मी सांगू शकत नाही. परंतु असा आधार असेल तर गुजराथ्यांना शिव्याशाप मोजण्याऐवजी आपल्या पायाखाली काय जळते आहे ते पहाणे हाच रास्त मार्ग होता. निव्वळ घटनात्मक व लोकशाही मार्गाचा अवलंब करून द्विभाषी मोडण्याची मागणी गुजराथ्यांकडूनच वदविता आली असती. तशी सूचनाही नागपूरच्या डॉ. खरे यांनी पुण्याच्या केसरीमधून केली होती. परंतु या व अशा मार्गांकडे किती महाराष्ट्रीय विचारवंतांचे लक्ष गेले ? असो.

## आत्मसंशोधनाची गरज

वरील सर्व विवेचनाचा सारांश असा की, महाराष्ट्र बुद्धिवान आहे, कर्तबगार आहे अशी विधाने कानाला कितीही गोड लागली तरी महाराष्ट्रीयांनी अद्याप ती सत्य असल्याचा पुरावा जरूर त्या प्रमाणात दिलेला नाही. त्यात मुख्यतः 'सांगे वडिलांची कीर्ती' हा प्रकार प्राधान्याने दिसतो. वस्तुस्थिती व अनुभव तर असा आहे की परप्रांतातील कित्येक महाराष्ट्रीय माणसे आपल्या वर्तनाने महाराष्ट्राचे नाव बद्दू करतानाच दिसतात. भांडकुदळ, एकांगी, हेकेखोर, अव्यवहारी स्वतःच्याच ( नसलेल्या ) मोठेपणावर खूष होणारी अशीच महाराष्ट्रीयांची मोठ्या प्रमाणात दुष्कीर्ती आहे. नेमून दिलेले काम करतील परंतु त्यातही महत्त्वाकांक्षा, जिज्ञासा दिसून येत नाही. स्वतंत्र व्यवसायाची कुवत नाही. यामुळेच बहुधा अजूनही अनेक गुजराथी लोक महाराष्ट्रीयांना नोकरीस ठेवण्याच्या मताचे आहेत. ही परिस्थिती अर्थातच कायमची रहाण्याचा संभव फारसा नाही.

इतर कसोट्या लावून पाहिल्या तरी या लेखातील विवेचनाला पुष्टीच मिळेल अशी माझी निश्चिती आहे. परंतु त्यात न शिरता येथे इतके म्हटले म्हणजे पुरे होईल की महाराष्ट्राने पोकळ घोषणांच्या आहारी न जाता आत्मसंशोधन व प्रत्यक्षानुभव या मार्गांची कास धरून भारताच्या विविध सार्वजनिक क्षेत्रात आपण नेमके कोठे बसतो हे डोळस बुद्धीने निरीक्षावे व आपल्या उणीवा दूर करण्याच्या मार्गाला लागावे हेच अंती हिताचे होईल. सध्या याप्रमाणे होत आहे असे म्हणणे कठीण आहे व यामुळेच आपल्याला योग्य ते स्थान मिळत नाही. हे जितक्या लवकर आपण उमजू तितक्या लवकर आपल्या उन्नतीचा मार्ग मोकळा होईल.

ह्या लेखाद्वारा महाराष्ट्राचा अधिक्षेप करावा असा बिलकूल हेतू नाही. महाराष्ट्राबाहेर अनेक वर्षांच्या वास्तव्यामुळे तुलनात्मक विचार व अभ्यास करण्याची संधी मला दैवयोगाने मिळाली व त्यातून प्राप्त झालेल्या दृष्टिकोनातूनच वरील विवेचन उपलब्ध झाले. महाराष्ट्रातील बुद्धी अनेक कारणांमुळे जणू कुजून जात आहे. तिच्यावर राख चढल्यामुळे तिचे तेज लुप्तप्राय होत आहे. ही राख फुंकून टाकून या बुद्धीचे तेज प्रज्वलित करण्याचे कार्य महाराष्ट्रानेच केले पाहिजे. अशा जाणीवेतून हा लेख लिहिला आहे. नवीन वादाला जन्म देण्यासाठी नव्हे. याच दृष्टीने मराठी भाषिक जनता या लेखाकडे पाहील अशी आशा व्यक्तवून हा काहीसा लांबलेला लेख पूर्ण करतो.

---










डॉ. व. वि. पारखे

# मराठी महाभारतातील श्रीकृष्णदर्शन

संस्कृत महाभारतामध्ये आपणास प्रथमतः श्रीकृष्णाचे दर्शन द्रौपदी-स्वयंवराच्या वेळेस घडते. त्यावेळी तो द्वारका सोडून आलेला असतो. महाभारतातील यानंतरच्या पुढील सर्व कथानकात कोठेही काही उल्लेखांव्यतिरिक्त, गोकुळातील त्याच्या पूर्वायुष्याचा निर्देश झालेला नाही! महाभारतात आपणास श्रीकृष्णाचे जे दर्शन घडते ते नानानट नाटकी, लीलाविग्रही, अवतारी श्रीकृष्णाचे घडत नसून, स्वतः हातात शस्त्र न धरिता युक्तीच्या चार गोष्टी सांगून, युद्धाचे, राज्यशास्त्राचे डावपेच खेळून भारतीय युद्धात पांडवांना यश मिळवून देणाऱ्या यादवप्रमुख, राजकारणी श्रीकृष्णाचे दर्शन घडते. महाभारतात काही ठिकाणी श्रीकृष्णांच्या गोकुळातील पूर्वायुष्याचे संदर्भ आलेले असून तेथे गोपस्थितीतील बाललीलांचा उल्लेख आलेला असला[१] तरी ते संदर्भ प्रसंगोपात्त आलेले असून महाभारतकारांनी, श्रीकृष्णाच्या कौरव-पांडवसंबंधातील केवळ ऐतिहासिक कृत्यांनाच भारतीय कथेत प्राधान्य दिलेले आढळते.

## व्यासांची श्रीकृष्णासंबंधीची दृष्टी : परमेश्वरी पूर्णावतार

याचे कारण असे असावे की, श्रीव्यासांनी आपल्या मनात, महाभारताची रचना करीत असता, 'इतिहास ग्रंथ' रचण्याचा संकल्प सोडलेला असावा. भारतीय प्रथेनुसार अनेक शतके, 'इतिहासपुराणः पञ्चमो वेदानाम्' असे मानले जात असून, 'भारतं पञ्चमो वेदः' अशी महाभारतासंबंधी एक उक्तीही प्रचलित होती[२]. काही काल गेल्यानंतर महाभारताची गणना लोक महाकाव्यात करू लागले असावेत. तेव्हा इतिहासाच्या दृष्टिकोनातून सामान्यतः हा ग्रंथ रचला गेला असल्यामुळे, श्रीकृष्णाच्या जीवनातील, भक्तांची भक्ती वर्धित करणारा दिव्य अलौकिक लीलाचरित्राचा भाग श्रीव्यासांनी महाभारतात वर्णन केलेला नसावा!

महाभारतातील श्रीकृष्णाच्या व्यक्तित्वाचा (Personality) अनेक चिकित्सक टीकाकारांनी अभ्यास केलेला आहे. महाभारतातील व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वाचे परिशीलन करीत असताना महर्षि अरविंद घोषांना महाभारतातील व्यक्ती, मानवी आशा-आकांक्षा व ध्येये असलेल्या परंतु अतिमानवी (super-human) व्यक्ती वाटतात. ते म्हणतात,[३]–

"The whole poem has been built like a vast national temple unrolling slowly its immense and complex idea from chamber to chamber, crowded with significant groups and sculptures and inscriptions, the grouped figures carved in divine or semi-divine proportions, a humanity aggrandised and half uplifted to superhumanity and yet always true to the human motive and idea and feeling the strain of the real constantly raised by the tones of the ideal, the life of this world amply portrayed but subjected to the conscious influence and presence of the powers of the worlds behind it, and the whole unified by the long embodied procession of a consistent idea worked out in the wide steps of the poetic story."

1. Studies in the Epics and Puranas : p. 58, cf. foot-note 23.
2. ibid; introduction, page xviii, foot-notes 1 & 2.
3. Vyasa and Valmiki : Sri. Aurobindo. (1956) Appendix pp. 192-93.



अनुक्रमणिका






परंतु भारताच्या प्राचीन संस्कृतीचे एक ख्यातनाम टीकाकार, श्री. ए. डी. पुसाळकर महाकाव्ये आणि पुराणे यांच्यावर झालेल्या अभ्यासाचा परामर्श घेत असता श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्त्वाविषयी आपले मत प्रतिपादित असताना म्हणतात,[1]–

" ...... the Puranas deal with the early life of Krisna and with other aspects not touched by the Mahabharata ... ... the Mahabharata presents Krisna as Yadava chief, a friend and counsellor of the Pandavas due to whose tactful guidance alone the latter came out successful in the Bharata war....... The activities of Krisna before and during the Bharata war as recorded in the Mahabharata, no doubt represent him as a human politician par excellence, though the Mahabharata at places attempts to identify him with the god of gods......"

संस्कृत महाभारताप्रमाणेच इतर अनेक पुराणात श्रीकृष्णाच्या जीवनातील निरनिराळ्या प्रसंगांचे वर्णन येते. इतकेच नव्हे तर काही पुराणात, महाभारतातील कथेचा सुद्धा निर्देश झालेला आहे. तेव्हा निरनिराळ्या पुराणात आणि महाभारतात श्रीकृष्णाच्या व्यक्तित्वाचा विकास कशाप्रकारे होत गेला, या प्रश्नाचा तुलनात्मक अभ्यास श्री. एस्. एन्. ताडपत्रीकर यांनी केलेला असून त्यांनी त्या अभ्यासात जो निष्कर्ष काढलेला आहे तो असा[2],:–

"Krishna was first glorified in the Mahabharata and the remaining account of his life, which had nothing to do with the Pandavas and their warfare, and was still in oral tradition was put together to be used in the Puranas."

सारांश, या सर्व ख्यातनाम विद्वानांच्या संशोधनावरून असा निष्कर्ष निघतो की, महाभारतातील 'श्रीकृष्ण' हा अतिमानवी (Super–human) व्यक्ती असला तरी, मानवी मनात उत्पन्न होणाऱ्या आशा, आकांक्षा वा ध्येये यांना सोडून वावरणारा तो नाही. या व्यक्तीच्या भोवती मानवी वलय असल्याने श्रीकृष्ण, कौरव पांडवांना आपल्यातीलच एक व्यक्ती वाटत असते !

अशा प्रकारे महाभारतामध्ये श्रीकृष्णाचे दर्शन जरी 'मानवी' व्यक्ती म्हणून घडत असले तरी श्रीव्यासांच्या मनात मात्र, श्रीकृष्ण हा विष्णूचा अवतार असल्याची कल्पना, महाभारत रचीत असतानाच वावरत होती खास ! परंतु महाभारतात त्या कल्पनेचा विस्तृत आविष्कार करण्यास, महाभारत हे ऐतिहासिक काव्य असल्याने श्रीव्यासांना फारसा अवसर मिळू शकला नाही ! पण त्या कल्पनेने भारावलेले त्यांचे मन मात्र ती कल्पना व्यक्त केल्यावाचून राहिले नाही.

महाभारताच्या भीष्मपर्वात श्रीमद्भगवद्गीता सांगितलेली असून त्यात श्रीकृष्ण हा परब्रह्म असल्याची कल्पना मांडलेली आहे. अर्जुन श्रीकृष्णाला म्हणतो,–

त्वमादिदेवः पुरुषः पुराण–
स्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
वेत्तासि वेद्यं च परं च धाम
त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥

–भगवद्गीता, अ० ११, श्लोक ३८.

–आणि श्रीकृष्णही अर्जुनाच्या या कल्पनेचा स्वीकार करीत म्हणतो–

सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो
मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो
......... चाहम् ॥

–भगवद्गीता, अध्याय १५, श्लोक १५ वा.

1. Studies in the Epics and Puranas : page 60.
2. The Krisna problem. (Annals of the B. O. R. I.), page 333.



अनुक्रमणिका







परंतु श्रीमद्भगवद्गीता मूळ महाभारतातील असावी काय ? हा प्रश्न विवाद्य असल्याने ती क्षणभर बाजूस सारली तरी महाभारतात अन्यत्रही श्री-व्यासांनी श्रीकृष्ण हा अवतार असल्याची कल्पना व्यक्त केलेली आहे.

महाभारताच्या शांतिपर्वामध्ये श्रीकृष्ण, आपण घेतलेल्या अवतारांचे विस्तृत स्पष्टीकरण करीत पांडवांना म्हणतो –

ततो रक्षःपतिं घोरं पुलस्त्यकुलपांसनम् ।
हनिष्ये रावणं संख्ये सगणं लोककण्टकम्॥८१॥
द्वापरस्य कलेश्चैव संधौ पर्यवसानिके ।
प्रादुर्भावः कंसहेतोर्मथुरायां भविष्यति ॥८२॥
तत्राहं दानवान् हत्वा सुबहून् देवकण्टकान् ।
कुशस्थलीं करिष्यामि निवेशं द्वारकापुरीम् ॥८३॥
–शांतिपर्व , मोक्षधर्मपर्वः अध्याय ३२६ वा.

येथे रामावतारानंतर, कृष्णावतारात आपण कोणती कार्ये करणार आहोत, ते श्रीकृष्णाने सांगितलेले आहे. मौसलपर्वात, श्रीकृष्णाच्या महानिर्वाणाबद्दल व्यास म्हणतात ,–

रथस्य पुरतो याति यः स चक्रगदाधरः ।
तव स्नेहात्पुराणर्षिर्वासुदेवश्चतुर्भुजः ॥२८॥
कृत्वा भारावतरणं पृथिव्याः पृथुलोचनः ।
मोक्षयित्वा जगत्सर्वं गतः स्वस्थानमुत्तमम् ॥२९॥
–मौसलपर्व, अध्याय ९ वा.

स्वर्गारोहणपर्वामध्ये तर स्पष्टच अवतारी कृष्णाचे वर्णन करीत म्हटले आहे,–

ददर्श तत्र गोविन्दं ब्राह्मेण वपुषान्वितम् ।
तेनैव दृष्टपूर्वेण सादृश्येनोपसूचितम् ॥२॥
दीप्यमानं स्ववपुषा दिव्यैरस्त्रैरुपस्थितम् ।
चक्रप्रभृतिभिर्घोरैर्दिव्यैः पुरुषविग्रहैः ।
उपास्यमानं वीरेण फल्गुनेन सुवर्चसा ॥३॥
–स्वर्गारोहणपर्व, अध्याय ४ था.

तात्पर्य, जरी महाभारतामध्ये श्रीकृष्णाच्या उत्तरायुष्याचेच चरित्र केवळ वर्णन करून श्रीकृष्णाच्या ऐतिहासिक कार्यासच प्राधान्य दिलेले असले तरी श्रीकृष्ण हा परमेश्वरी अवतार असल्याची कल्पना त्यांच्या मनात रेंगाळत असून ती महाभारताच्या शेवटल्या पर्वांमध्ये त्यांनी व्यक्त केलेली आहे असे आपणास निश्चित म्हणता येते.

## पूर्ण मानवी पुरुषोत्तम

श्रीव्यासांनी जरी श्रीकृष्णाचे ऐतिहासिक कार्य महाभारतात प्राधान्याने वर्णन केले तरी श्रीकृष्णाच्या दिव्य लीला वर्णन करणे या ग्रंथात जमले नाही. म्हणून श्रीव्यासांचे मन खिन्न, अशांत झाले होते. हरिवंश हे महाभारताचे खिलपर्व समजतात. त्यात महर्षि व्यास म्हणतात,[१]

महाभारतमाख्यानं बह्वर्थं श्रुतिविस्तरम् ।
कथितं भवता पूर्णं विस्तरेण मया श्रुतम् ॥१२॥
तत्र शूराः समाख्याता बहवः पुरुषर्षभाः ।
नामभिः कर्मभिश्चैव वृष्ण्यन्धक महारथाः ॥१३॥
तेषां कर्मावदातानि त्वयोक्तानि द्विजोत्तम ।
तत्र तत्र समासेन विस्तरेणैव मे प्रभो ॥१४॥
नच मे तृप्तिरस्तीह कथ्यमाने पुरातने ।
एकश्चैवमतो राशिर्वृष्णयः पाण्डवस्तथा ॥१५॥
–हरिवंश, अध्याय १ ला.

या ठिकाणी श्री व्यासांनी आपल्या अतृप्तीचा उल्लेख स्पष्टपणे केलेला आहे. श्रीमद्भागवतातही महाभारत रचले तरी व्यासांचे हृदय अतृप्त राहिल्याचा उल्लेख आलेला असून भागवतधर्माचे निरूपण न केल्यामुळे ही अशांतता प्राप्त झालेली आहे काय ? असा प्रश्न त्याना पडल्याचेही तेथे वर्णिलेले आहे. श्रीव्यास म्हणतात–

स्त्रीशूद्रद्विजबन्धूनां त्रयी न श्रुतिगोचरा ।
कर्मश्रेयसि मूढानां श्रेय एवं भवेदिह ।
इति भारतमाख्यानं कृपया मुनिना कृतम् ॥२५॥
एवं प्रवृत्तस्य सदा भूतानां श्रेयसि द्विजाः ।
सर्वात्मकेनापि यदा नातुष्यद्धृदयं ततः ॥२६॥
नातिप्रसीदद्हृदयः सरस्वत्यास्तटे शुचौ ।
वितर्कयन्विविक्तस्थ इदं प्रोवाच धर्मवित् ॥२७॥
. . . . . . . . . . . .
भारतव्यपदेशेन ह्याम्नायार्थश्च दर्शितः ।
दृश्यते यत्र धर्मादि स्त्रीशूद्रादिभिरप्युत ॥२९॥
अथापि बत मे देह्यो ह्यात्मा चैवात्मना विभुः ।
असंपन्न इवाभाति ब्रह्मवर्चस्यसत्तमः ॥३०॥

१. हरिवंशः पंडित रामचंद्रशास्त्री किंजवडेकर संपादित प्रत ( १९३६ ) चित्रशाळा प्रेस.



अनुक्रमणिका






किं वा भागवता धर्मा न प्रायेण निरूपिताः ।
प्रियाः परमहंसानां त एव ह्यच्युतप्रियाः ॥३१॥
—श्रीमद्भागवत, प्रथमस्कंध, अध्याय ४

श्रीव्यासांनी महाभारताख्यान सांगितले परंतु त्यांच्या मनाला समाधान लाभले नाही; त्यांनी शूरांच्या शौर्याचा इतिहास कथन केला परंतु त्यायोगे त्यांची आंतरिक तळमळ नष्ट झाली नाही; त्यांच्या व्याकुळ मनास भगवद्भक्तीची तळमळ लागली होती ! भगवंताच्या अलौकिक लीला वर्णन करून भक्ति-नामरसायनाने तृप्त होण्याची त्यांच्या अंतरात्म्याला तृष्णा लागली होती म्हणून श्रीकृष्णाच्या दैवी लीलांचे वर्णन करणारा , 'श्रीमद्भागवत पुराण' हा ग्रंथ त्यांनी निर्माण करून परमेश्वराच्या पूर्णावताराचे —श्रीकृष्णाचे— दिव्य चरित्र त्यांनी तेथे वर्णिले.

अशा प्रकारे श्रीव्यासांना कृष्णाचे दिव्य माहात्म्य गाण्यास विस्तृत क्षेत्र उपलब्ध झाल्याने त्यांच्या मनातील भक्तिभावाचा प्रचंड स्रोत खळखळ करीत श्रीमद्भागवतात प्रकट झालेला आहे. भागवतामध्ये व्यासांनी शब्दबद्ध केलेली श्रीकृष्णमूर्ती अलौकिक आहे. ती परमेश्वरी पूर्णावताराची असूनही पूर्ण-मानवी पुरुषोत्तमाची आहे. त्यामुळे श्रीकृष्णाच्या व्यक्तित्वात ( in personality ) दैवी शक्ती आणि मानवी आचार यांचा सुरेख संगम झालेला आहे. श्रीकृष्णाचे मानवी आचार, श्रीकृष्णाच्या दिव्यत्वात विलीन होतात आणि पूर्णावतारी श्रीकृष्णाचे दिव्यत्व, त्याच्या मानवी लीलांना उजाळा प्राप्त करून देते. त्यामुळे या पूर्णावतारी पुरुषोत्तमाच्या अवतारी लीलांचे वर्णन करताना व्यासभक्तिवल्लरी फुलारते, तिच्या भावकलिका चैतन्याने बहरू लागतात, आणि त्या पूर्णोन्मिलित बहरातून दरवळणारा श्रीकृष्णभक्तिभावाचा सुगंध मनास मंत्रमुग्ध करून सोडतो.

## मराठी वाङ्मयावर कृष्णचरित्राचा परिणाम

प्राचीन मराठी वाङ्मयावर श्रीमद्भागवतातील या कृष्णाची अवीट मोहिनी पडलेली आहे. श्रीकृष्णाच्या शैशवापासून ते महाप्रस्थानापर्यंतच्या जीवनातील अनेकविध लीलांचे दर्शन मोठ्या भाव-पूर्णतेने प्राचीन मराठी कवींनी घडविलेले आहे. श्रीकृष्णाच्या शैशवातील लीलांनी मराठी मनावर इतक्या प्रकर्षाने पकड बसविली आहे की, महाराष्ट्रीय शिशूचा नामकरण विधी 'कुणी गोविंद घ्या कुणी गोपाळ घ्या' या बालकृष्णाच्या नामाने साजरा केला जातो ! बाळकृष्ण वाढत जातो तशा त्याच्या लीलाही वाढत जातात. खेळता खेळता श्रीकृष्णाने माती भक्षण केली असता जेव्हा, बलराम 'मृत्तिका सुत तुझा घननीळा भक्षितो,' अशी चहाडी यशोदे-जवळ करतो, तेव्हा क्रुद्ध होऊन कृष्णाला शासन करू पाहणाऱ्या यशोदेला तो स्वमुखात विश्वरूप-दर्शन घडवितो; तो शिंकी, मडकी तोडून दहीलोणी फस्त करतो, वाळवंटात साधुसंतांशी झगडा करतो, कधी त्यांच्याबरोबर कीर्तन करता करता नाचतो !

याच बालकृष्णाच्या दैवी लीला श्रीमद्भागवतादी पुराणात वर्णिलेल्या आहेत. त्याने नारदाच्या शापाने शापभ्रष्ट झालेल्या नलकूबर आणि मणिग्रीव या दोन कुबेरपुत्रांचा उद्धार केलेला आहे. शिशू असूनही मायावी पूतनेचा वध त्याने केला आहे ! याच बालकृष्णाने तृणावर्तास दगडावर आपटून ठार मारले, कालियाचे मर्दन केले, इंद्राचा नक्षा उतरवून गोवर्धनो-द्धार केला, धेनुकासुर, प्रलंबासुर, कंस, चाणूर यांचे मर्दन केले. असा हा लीलाविग्रही श्रीकृष्ण आहे !

मस्तकी मोरपीस खोवून वेणूवादन करणाऱ्या या घनश्यामाचे अनेक कवींना वेड लागले आहे. वामनपंडितांपासून गोविंदाग्रजांपर्यंत अनेक मराठी कवींना त्याच्या मुरलीने मोहून टाकले आहे. नव-यौवनाने बहरलेल्या श्रीकृष्णाच्या प्रेमलीलांवर अनेक कवींनी रचना केलेली आहे. एकनाथादी संतांच्या गौळणी, शाहिरी काव्ये आणि वामनपंडितकृत काव्यात श्रीकृष्णाच्या प्रेमलीला वर्णिल्या गेल्या आहेत. तेथील बाह्य शब्द जरी शृंगारिक वाटले तरी ध्वनी मात्र आध्यात्मिक आहे. श्रीकृष्ण-गोपी आणि श्रीकृष्ण-राधा यांच्या अन्योन्य प्रेमसंबंधावर जरी अनेकांनी वादंग माजविले असले तरी त्यातूनच मधुरा भक्तीचा उगम झालेला आहे. मध्ययुगामध्ये सर्व भारतात या शृंगारभक्तीचा विस्तार झालेला आहे.

असा आहे हा मराठी काव्यातील श्रीकृष्ण ! नानानटनाटकी, लीलाविग्रही ! हा पुरुषोत्तम, परमेश्वराचा पूर्णावतार म्हणून आपली मुद्रा लोकांच्या हृत्पटलावर उठवून ठेवीत आहे. भागवतादी पुराणांनी मोठ्या भक्तिभावाने श्रीकृष्णाच्या या विविध लीला वर्णन करून भक्तिशास्त्र वृद्धिंगत केले; त्यातल्या त्यात, श्रीमद्भागवतकारांनी श्रीकृष्ण कथा मोठ्या आकर्षक पद्धतीने आणि रसाळवाणीने सांगितल्या आहेत. प्राचीन मराठी काव्यात बव्हंशाने भागवतातील श्रीकृष्णाचेच दर्शन घडते, असे म्हटले असता चूक ठरू नये !

या सर्व विवेचनावरून, श्रीकृष्णाच्या पूर्णायुष्याची कल्पना वाचकांना येऊ शकेल. श्रीमद्भागवतात श्रीकृष्णाच्या ऐतिहासिक कार्याचा (ज्याचा उल्लेख महाभारतात झालेला आहे) उल्लेख झालेला असून श्रीमन्महाभारतात त्याच्या पूर्वायुष्याचा निर्देश (जो श्रीमद्भागवतात प्रामुख्याने वर्णिलेला आहे) झालेला असल्याने, ज्या हिंदुसंस्कृतीसाठी हे दोन ग्रंथ लिहिले गेले त्यांना दोन्ही ठिकाणी वावरणारी श्रीकृष्ण ही व्यक्ती एकच वाटत असून ती परमेश्वराचा अवतार वाटते. डॉ. सुखटनकर श्रीकृष्णसमस्येचा सर्वांगीण खल करीत म्हणतात,[१]–

" The unsophisticated Indian, who brings faith to bear on the subject, believes simply sri Krishna to be an Avatara of Visnu or Narayana ( who to him are the same, being only different aspects of the same Supreme Being ) derives comfort and consolation from the belief or conviction that as sri Krsna aided in the past the righteous Pandavas, so would He help his devotees now in this age in their own trails and tribulations of life, if they lived righteously, with full faith in the Saviour ...... ."

–आणि चिकित्सकाच्या दृष्टिकोनातून ते म्हणतात[२] –

" The epic poets view Arjuna and sri Krisna simultaneously as the jivatman and the Paramatman Indeed to the epic poets the symbols appear to have become the reality, and the real persons merely shadows. "

सारांश श्रीकृष्ण परमेश्वरी अवतार असल्याची कल्पना आता सर्वत्रच दृढमूल होत गेली आहे. मराठी महाभारतांमध्ये श्रीकृष्णाकडे पाहण्याची दृष्टी कशी होती, हे पाहणे मनोरंजक ठरेल.

श्रीधरस्वामी आणि मोरोपंत यांनी श्रीकृष्णाला भक्तवत्सल परमेश्वर असे मानून 'भक्तकामकल्पद्रुम', 'लीलाविग्रही', 'भक्तजनपालन', 'पूर्णब्रह्मानंद', 'श्रितरक्षणकीर्तिमहाशक्तीचे महापीठ', 'मुक्तिपति', अशा विशेषणांची योजना, महाभारतास सोडून केली आहे.[३] या व्यतिरिक्त श्रीधरस्वामींनी श्रीकृष्णाला उद्देशून 'वनमाली', 'इंदिरावर'[४] अशी अ-महाभारतीय विशेषणे वापरलेली आहेत. माधवस्वामी श्रीकृष्णाला 'भवघ्न भगवंत', 'पुंडरीकाक्ष' असे संबोधितात.[५] प्रायः असा दृष्टिकोन श्रीमद्भागवताचा आहे.

उत्तरेच्या गर्भाचे रक्षण श्रीकृष्णाने आपले सुदर्शनचक्र प्रेरून केल्याचा श्रीमद्भागवतातील कथा-

१. On the Meaning of the Mahabharata : Dr. V. S. Sukthankar; p. 97

२. ibid; P. 100.

३. पांडवप्रताप अध्याय ५५ ओव्या– ३१, ३६, ३७; आर्याभारत ( मोरोपंत ) स्त्रीपर्व. अध्याय २, आर्या १५, १६

४. पांडवप्रताप अध्याय ५३ – ओव्या ३०, ४२

५. माधवस्वामीकृत ऐषीक पर्व अध्याय १ ला ओवी ६०.

हृदयात भक्तिभावाच्या ऊर्मींचा प्रकर्षाने उद्रेक झाला.

मराठी महाभारतकारांनी भक्तीच्या प्रेरणेमुळे व्यास महाभारताचे मराठी आविष्कार निर्मिल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. त्या भक्तीची प्रभावी पकड मराठी महाभारतकारांच्या मनावर असल्याने, त्यांनी श्रीकृष्णाचे दिव्य चरित्र गाइले, आणि श्रीकृष्णाच्या मानवी कर्तृत्वापेक्षा त्याच्या अवतारी कृत्यांनाच प्रकर्षाने उठाव दिला. साहजिकच त्याचा परिणाम असा झालेला आहे की, मराठी महाभारतातील श्रीकृष्णाचा तोंडावळा, श्रीमद्भागवतातील श्रीकृष्णाच्या शब्दचित्राशीच जुळत असलेला दिसून येतो !

मराठी वाङ्मयात श्रीकृष्णाचे दर्शन कशा प्रकारचे घडते, हे पाहण्याचा प्रयत्न श्री. जे. इ. अॅबट यांनी केलेला आहे. काही प्राचीन नामवंत कवींच्या प्रार्थना ( Prayers ) त्यांनी गोळा केल्या आणि त्यांचा अभ्यास करून त्यांनी जो निष्कर्ष काढलेला आहे, त्यात ते म्हणतात[1],

" It is that there have been two streams of thought regarding Krishna. One is the Krishna of the Bhagavadgita, the other the Krishna of the Purana ...... The concept of Krishna of the Bhagavadgita is very old, and in his display of human and divine qualities the moral elements are of a high order ...... There has been, however, another stream of thought that has made the most of the details of Krishna's early life, as described in the Bhagavata Purana. As this stream flowed it gathered into it cess-pools of thought, sewerage of imaginations, until its revolting outflow into depraved cult and debasing literature, shooks the moral sense. But in this the Marathi poet saints had no part. Their writings are pure, their conception of morals high. Their stream of thought originated in the pure spring of Krishna of the Bhagavadgita, and continued pure to the end. "

मागील सर्व विवेचनावरून, श्रीमद्भगवद्गीतेतील श्रीकृष्ण आणि श्रीमद्भागवतातील श्रीकृष्ण ही एकच व्यक्ती आहे हे स्पष्ट व्हावे. तेव्हा श्री. जस्टिन अॅबट यांची श्रीमद्भगवद्गीतेतील दैवी श्रीकृष्ण आणि श्रीमद्भागवतातील दैवी श्रीकृष्ण भिन्न असल्याची कल्पना भारतीय तत्त्वप्रणालीनुसार स्वीकारता येत नाही. तसेच या लेखात मराठी महाभारतकारांच्या महाभारताविष्कारात, श्रीमद्भागवतातील अवतारी श्रीकृष्णाचेच दर्शन घडत असल्याचा साधार निष्कर्ष काढलेला असून त्यावरून आपणास असे स्पष्ट म्हणता येईल की, महाभारतात आढळणारा दैवी श्रीकृष्ण हाच अभिन्नपणे श्रीमद्भागवतात वावरत असल्याची, प्राचीन कवींची दृढ श्रद्धा होती, त्यांना श्रीमद्भगवद्गीतेतील श्रीकृष्ण या दोन भिन्न व्यक्ती वाटत नव्हत्या !

श्रीकृष्णपर प्राचीन मराठी वाङ्मयातील काही भागावर श्री. जस्टिन अॅबट यांनी, " severage of imaginations ", " depraved cults and debasing literature" इत्यादी व्यक्त केलेल्या मतांचा परामर्श घेण्याचे हे स्थळ नव्हे ! कदाचित् ते मराठीतील कृष्णलीलापर शृंगारिक भागाविषयी आपले मत व्यक्त करीत असावेत. परंतु हा विषय या ठिकाणी चर्चिण्याचे कारण नसल्याने, त्याचा स्वतंत्ररीत्याच विचार करणे इष्ट व्हावे म्हणून तो येथे चिकित्सक टीकाकारांच्या निदर्शनास आणून दिला जात आहे इतकेच !

1. Stotramala : Justine E. Abbott. ( 1929. ) pp. x–xi. Preface.












**संस्कृत–**

( १ ) भाण्डारकर ओरिएण्टल रिसर्च इन्स्टिटचूटचे महाभारत–शांति–मौसल–स्त्री– स्वर्गारोहण पर्वे

( २ ) श्रीमद्भगवद्गीता

( ३ ) हरिवंश : संपा. पं. रामचंद्रशास्त्री किंजवडेकर ( १९३६ ) चित्रशाळा.

( ४ ) श्रीमद्भागवत, प्रथमस्कंध संपा. श्री. दा. सा. यंदे

**मराठी-**

( १ ) श्रीधरस्वामीकृत पांडवप्रताप.

( २ ) मोरोपंत– आर्याभारत. ( पराडकर प्रत )

( ३ ) माधवस्वामी– मराठी महाभारत– स्त्री– ऐषीक - मौसल पर्वे.

( ४ ) विष्णुदासनामा–मराठी महाभारत–ऐषीक– स्त्री– स्वर्गारोहण पर्वे.

**मराठी–त्रैमासिके–**

महाराष्ट्र साहित्य पत्रिका –

वर्ष ३४, अंक १३९

वर्ष ३५, अंक १४२, १४३

वर्ष ३६, अंक १४६, १४७.

**प्रबन्ध–**

( १ ) श्रीमद् व्यास महाभारताचे मराठी आविष्कार डॉ. व. वि. पारखे ( १९६३ ) मुंबई.

( २ ) विष्णुदास नाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास. डॉ. सरोजिनी शेंडे.(१९६०) मुंबई.

**इंग्रजी–**

(1) Krṣṇa Problem (Annals of the B. O. R. I., Poona) : S. N. Tadpatrikar.

(2) Stotramala : Justine E. Abbott (1929)

(3) Studies in the Epics and Puranas : A. D. Pusalkar. Bhavan's Book University No. 36 ; 1955

(4) On the meaning of the Mahabharata : Dr. V. S. Sukthankar 1957. Pnblishers- The Asiatic Society of Bombay.

(5) Vyasa and Valmiki- Sri. Aurobindo. 1956.

---





अनुक्रमणिका








प्रा. म. ना. लोही

# हरिभाऊंच्या कादंबऱ्यातील समाजदर्शन

एकोणविसाव्या शतकाच्या अस्ताचा आणि विसाव्या शतकाच्या उदयाचा काळ हा महाराष्ट्रातील सामाजिक नि राजकीय परिवर्तनाचा संधिकाळ होय. याच काळात भारतातील बहुतेक भाषातील ललित वाङ्मयाचा विकास झाला . महाराष्ट्र तरी याला अपवाद कसा असणार ? काव्य, कथा, कादंबरी, नाटक इत्यादी वाङ्मयप्रकार याच काळात मराठीत विकसित झाले. या नवविकसित वाङ्मयाचे लेखक आणि वाचक उच्चवर्णीय आंग्लविद्या विभूषित होते. साहजिकच पाश्चात्य सुधारकी विचारांचा पगडा त्यांच्यावर होता. पाश्चात्य सुधारणा मराठी समाजजीवनात आविर्भूत व्हाव्यात असे तत्कालीन लेखक-वाचकांना वाटत होते. तत्कालीन लेखकांची जीवनानुभूती मर्यादित होती. त्यामुळे सामान्यतः वाङ्मयातून उच्चवर्णीयांचे जीवन आणि त्यांचेच प्रश्न मांडले जात. हरिभाऊ आपटे हे याच काळातील एक ज्येष्ठ आणि श्रेष्ठ ललित-लेखक होत. इ. स. १८८५ ते इ. स. १९१५ हा त्यांचा कादंबरी लेखनाचा काल. सुमारे अडीच तपांच्या काळात त्यांनी दहा सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यांची नावे अशी : मधली स्थिती, गणपतराव, पण लक्षात कोण घेतो ! यशवंतराव खरे, मी, जग हे असे आहे, भयंकर दिव्य, मायेचा बाजार, आजच आणि कर्मयोग. यापैकी गणपतराव, कर्मयोग आणि आजच या तीन कादंबऱ्या अपूर्ण आहेत. हरिभाऊंनी आपल्या कादंबरी दशकातून तत्कालीन उच्चवर्णीयांचे जे जीवनदर्शन घडवले आहे त्याचाच विचार आता आपल्याला करावयाचा आहे.

हरिभाऊंच्या काळातील उच्चवर्णीय समाजाचे जीवन आणि त्यातील सामाजिक समस्यांचा परिचय आपण सर्वप्रथम करून घेतला पाहिजे. पेशवाई जाऊन महाराष्ट्रावर इंग्रजी अंमल सुरू झाला आणि पुण्यातील संस्कृत विद्या जाणणारे शास्त्री-पंडित निराधार झाले. तरीही खऱ्या अर्थाने आर्थिक समस्या उद्भवली नव्हती. मंडळी चार पैसे गाठीशी बांधून होती. परिस्थितीतील बदल आणि गांभीर्य ओळखून या मंडळीने आपल्या मुलांना इंग्रजी शिक्षणाची मोकळिक दिली. परंतु इंग्रजी विद्या नि इंग्रजी संस्कृतीचा प्रभाव पडून तरुणपिढी दुर्व्यसनी आणि नीतिभ्रष्ट झाली. आपल्या पतिनिष्ठ सालस बायकांना छळू लागली. तरी जुन्या लोकांना त्यात काही वावगे दिसले नाही. मात्र स्त्रीशिक्षण, विधवाविवाह यासारख्या रूढि-विरोधी गोष्टींना त्याचा विरोध होता. समाजाला पुरुषांचे स्वातंत्र्य मान्य असले तरी स्त्रीस्वातंत्र्याचा विचार असह्य वाटत होता. म्हणूनच सुधारकांनी स्त्रियांचा कैवार घेऊन त्यांच्या समस्या सोडविण्याचे प्रयत्न चालवले होते.

राजकीय पारतंत्र्याबद्दल समाजाला खेद अगर खंत नव्हती. इ. स. १८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध, इ. स. १८७९ चे वासुदेव बळवंत फडक्यांचे बंड आणि क्रांतिकारकांची दहशती कृत्ये यांचा फारसा परिणाम सुशिक्षितांवर झालेला दिसत नव्हता. प्रथम सामाजिक सुधारणा की राजकीय स्वातंत्र्य, याबद्दल मतभेद होते. राजकारणात जहाल नि मवाळ असे पक्ष पडले होते. प्लेग आणि दुष्काळ यामुळे बहुजन समाज दीन-दरिद्री बनला असला तरी त्याची झळ पांढरपेशा वर्गाला लागलेली नव्हती.

अशा वातावरणात, एका सुखवस्तू ब्राह्मण कुटुंबात जन्मलेल्या आणि पुण्याच्या ब्रह्मवृंदात वाढलेल्या सुधारकी वळणाच्या हरिभाऊ आपट्यांनी कादंबरी लेखनाला इ. स. १८८३ च्या सुमारास प्रारंभ केला. त्यांची ‘मधली स्थिती’ ही पहिली कादंबरी इ. स. १८८५ साली ‘पुणे वैभव’ या साप्ताहिकातून ‘आजकालच्या गोष्टी’ या सदरात जेव्हा प्रसिद्ध होऊ लागली तेव्हा पुण्यातील वाचकवर्ग थक्क होऊन गेला. पांढरपेशा वर्गात खळबळ माजून गेली. अहो,








खळबळ माजणार नाही तर काय? या कादंबरीत तत्कालीन उच्चवर्णातील दुर्गुणांचे आणि दुर्व्यसनांचे अत्यंत विदारक चित्र लेखकाने रेखाटले होते. तिच्यातील कपटकारस्थानी गोविंदराव, त्याची रखेली बदफैली काकूबाई, मद्यपी नि वेश्यागमनी विनायकराव आणि त्याच्या छळाला बळी पडलेली सहनशील साध्वी सरस्वती आदी व्यक्ती प्रातिनिधिक असल्याने कित्येकांना परिचित वाटल्या. कारण तत्कालीन पुण्यात अशा घटना घडलेल्या आणि व्यक्ती अस्तित्वात असणाऱ्या होत्या. वस्तुतः 'मधली स्थिती' ही कादंबरी हरिभाऊंनी रेनाल्डच्या 'ओल्ड लंडन' वरून भाषांतरित करायला घेतली होती. तथापि, हरिभाऊंच्या प्रतिभेने लंडनवरून पुण्यात झेप घेतली. 'मधल्या स्थिती' त पुण्यातील उच्चवर्णीय सुखवस्तू नि सुशिक्षित म्हणवणाऱ्या समाजाच्या स्थितीचे स्वच्छ प्रतिबिंब पडले होते. हरिभाऊंचे चरित्रकार श्री. आंबेकर तशी कबूली देऊन म्हणतात की, इ. स. १८७८ सालच्या पुण्याचे हे चित्र असून तिच्यातील, म्हणजे कादंबरीतील , पात्रे पुण्यात पदोपदी भेटणाऱ्या व्यक्ती होत. अर्थात् स्वतःच्या बचावासाठी प्रस्तावनेत हरिभाऊ लिहितात की, नावे व स्थळे ही ठाऊक असलेली असल्यामुळे पात्रेही खरी आहेत असा गैरसमज होण्याचा संभव आहे तो मुळीच होऊ नये. यावर लोकांनी कितपत विश्वास ठेवला असेल ते त्यांनाच माहीत !

हरिभाऊंची सर्वात गाजलेली कादंबरी म्हणजे 'पण लक्षात कोण घेतो!' इ. स. १८९२ साली 'करमणूक' या त्यांच्याच साप्ताहिकातून यमूची ही हृदयद्रावक आत्मकथा जेव्हा प्रसिद्ध होऊ लागली तेव्हा पुन्हा एकदा समाजात खळबळ माजली. बालविवाह, जरठ-तरुणी विवाह, तारुण्यातील वैधव्य आणि केशवपनाची राक्षसी रूढी या सर्वांवर हरिभाऊंनी कोरडे ओढले आहेत. पण ते अशा कौशल्याने की, कादंबरीची कलात्मकता कमी न होता, तिला प्रचाराचे स्वरूप न येता, तिने सहस्रावधी स्त्रीपुरुषांच्या हृदयाचा ठाव घेतला. यमूला छळणारा 'शंकरमामंजी' आपल्या खलप्रवृत्तीने मराठी वाङ्मयात अजरामर झाला. तरुण विधवेच्या रूपात यमूचा होणारा छळ, तिला केली जाणारी दुरुत्तरे आणि शेवटी तिच्यावर झालेला गहजब वाचून हृदयाला पीळ पडतो. आज सरस्वती, अंबू, यमू अगर पद्मा यांच्या समस्या सुटल्या आहेत म्हणून त्यांच्या कथा आजच्या वाचकाला कृत्रिम वाटणे संभवनीय आहे. तथापि, हरिभाऊंच्या काळात ब्राह्मण समाजात असलेल्या स्त्रियांची दैना एवढ्या प्रभावी रीतीने मांडणारा दुसरा कादंबरीकार झाला नाही.

केवळ स्त्रीशिक्षणाचा आणि स्त्रीस्वातंत्र्याचा प्रश्न घेतला तर त्यासंबंधात पूर्वीची आबाळ, आणि नंतरची सुधारणा यांचा हरिभाऊंनी काढलेला आलेख समाजस्थितीमधील बदल दर्शविणारा आहे. सुरुवातीच्या कादंबऱ्यातून हरिभाऊंनी स्त्रीशिक्षणाची आवश्यकता प्रतिपादन केली. कारण सुशिक्षित पती आणि अशिक्षित पत्नी यांच्यातील बौद्धिक असमानतेमुळे वैवाहिक जीवनात सुख आणि समाधान प्रत्ययाला येत नव्हते. याचा अर्थ असा नव्हे की, त्याकाळचे दुर्व्यसनी पुरुष ज्यांच्याकडे ओढले जात त्या बाजारू बायका बौद्धिकदृष्टचा उच्च पातळीवर होत्या. अविभक्त कुटुंबपद्धतीत तरुण स्त्रीपुरुषांच्या, नव्हे, प्रत्यक्ष पतिपत्नीच्या भेटीगाठीत नि बोलाचालीत अडथळा येत असे. मोकळ्या मनाने शृंगाराला वाव नसे. त्यामुळे काही पुरुषांचा ओढा स्वैराचारी स्त्रियांकडे असणे संभवनीय होते. शिवाय, पाश्चात्य संस्कृतीचा जो प्रथम प्रभाव पडला त्यातून आलेला उच्छृंखलपणा पुढे क्रमाक्रमाने कमी झाला. 'मधली स्थिती' आणि 'पण लक्षात कोण घेतो!' या कादंबऱ्या हरिभाऊंनी लिहिल्या तेव्हाची स्थिती आणि 'भयंकर दिव्य' नि 'मायेचा बाजार' लिहिल्या तेव्हाची परिस्थिती यात जे अंतर पडले आहे ते समाजस्थितीमधील असून त्यांचे प्रतिबिंब या कादंबऱ्यात स्पष्ट उमटलेले आहे. यमूच्या काळी विधवेच्या पुर्नविवाहाची कल्पना करणे देखील समाजाला पाप वाटत होते. उलट 'भयंकर दिव्य' मधील बळवंतरावांनी विधवेशी पुर्नविवाह करूनही समाजाने त्यांना वाळीत टाकले नव्हते. 'मायेचा बाजार' मधील मथुराबाई तरुणपणी विधवा झाल्यावर शिक्षिकेची नोकरी पत्करून कुटुंबाचा भार उचलते तरी समाज तिकडे कानाडोळा करतो. बालविवाह बंद झाला नसला तरी वयोमर्यादा थोडी वाढली. विवाहपूर्व








आणि विवाहोत्तर स्त्रियांना शिक्षण दिले जाऊ लागले. ' मायेचा बाजार ' मध्ये मालतीला तिच्या वडिलांनी चौदापंधरा वर्षांपर्यंत अविवाहित ठेवून शिक्षण दिलेच पण तिचा नवरा परदेशात गेल्यावर तिच्या सासऱ्याने तिचे शिक्षण पुढे चालू दिले. वसंतरावांचे वडील सून सुशिक्षित असावी याविषयी दक्षता घेतात. हळूहळू पुरुषांना स्त्रियांविषयी आदर वाटू लागला आहे. तद्वतच स्त्रीपुरुषांचा मिश्र समाज बनू लागला आहे. ही सूक्ष्म स्थित्यंतरे हरिभाऊंच्या चौकस नजरेने टिपली आणि लेखणीने ग्रथित केली.

यासाठी हरिभाऊंनी वापरलेले तंत्र अभिनव आहे. त्यांनी आधीच्या कादंबऱ्यातील पात्रे पुढील कादंबऱ्यात आणली आहेत. ' मधली स्थिती ' मधील विष्णू-यमुना ही जोडी ' गणपतराव ' आणि ' पण लक्षात कोण घेतो ' मध्येही आढळते. गणपतरावांचे स्नेही नानासाहेब व पत्नी यशोदाबाई ' पण लक्षात कोण घेतो ' मध्ये आहेत. यमुना नि रघुनाथराव यांचे या दोन जोड्यांशी स्नेहाचे संबंध आहेत. ' आजच ' आणि कर्मयोग ' या कादंबऱ्या ' यशवंतराव खरे ', ' गणपतराव ' आणि ' मी ' ह्यांचे उत्तरार्धच होत. पूर्वसूत्राशी पुढील सूत्र जोडल्यामुळे समाजस्थितीमधील बदल प्रभावीपणे दाखवता आला. त्यात संगती साधता आली. अनपेक्षितता टाळता आली. हरिभाऊंच्या आरंभीच्या कादंबऱ्यांचे केन्द्र विवाहित युवती हे होते. किंबहुना, त्यांच्या कादंबऱ्यात स्त्रीच्या सर्व अवस्था –कन्या, भगिनी, पत्नी, सधवा, विधवा, मुग्धा, प्रौढा, वृद्धा इत्यादी– चित्रित केलेल्या दिसून येतात. कुटुंबात स्त्रीचे स्थान महत्त्वाचे असल्याने तिची स्थिती सुधारल्याखेरीज समाज सुधारणार नाही अशी हरिभाऊंची धारणा होती, आणि ती रास्त होती. उदारमतवादी पाश्चात्य शिक्षणाच्या प्रभावाने पुरुषांच्या स्त्रीकडे पाहण्याच्या दृष्टिकोनातील बदल हरिभाऊंनी कसा कौशल्याने दाखवला हे आपण पाहिले. त्याचप्रमाणे कुटुंबातील वडील-मुलांचे संबंध कसे असावेत हे दाखवायलाही ते चुकले नाहीत. पूर्वी घरातील वडील माणूस हा ' कर्तुमकर्तुम् ' सर्वसत्ताधारी असे. त्याचा सर्वांना धाक असे. त्याच्या लहरीनुसार कुटुंबातील कारभार चाले. परंतु शिक्षणाने घरातील हा सत्ताधारी निवळू लागला. तरुणांना स्वातंत्र्य देऊ लागला. त्यांच्याशी स्नेहाने राहू लागला. मुलांना काही बाबतीत स्वातंत्र्य देण्यात आले नाही तर कसे खटके उडतील याचे चित्रण हरिभाऊंनी 'भयंकर दिव्या' त दादासाहेब व पद्माकर यांच्या पत्रव्यवहारावरून दाखवले आहे. 'मायेच्या बाजारा ' त वसंतरावाचे वडील त्याला सांगतात, " मी तुझा एक वृद्ध स्नेही आहे. तुझ्यापेक्षा मला जास्त अनुभव आहे.....जुन्या चालीप्रमाणे वडिलांची भीती बाळगावयाची, तशी बाळगू नकोस.... जे काय तुझ्या मनात असेल ते स्पष्टपणे मला सांग " मुलींच्या बाबतीतही वडिलधारी मंडळी किती उदार होत चालली होती हे ' भयंकर दिव्य ' आणि ' मायेचा बाजार ' या कादंबऱ्यात हरिभाऊंनी दाखवून दिले आहे. तरुणतरुणींच्या परस्पर संबंधातून स्नेहापासून प्रेमापर्यंतची मजल गेलेली त्यांनी दाखवली आहे. वसंतरावाचे पद्मेवर प्रेम असून तिचा दुसऱ्याशी विवाह झाल्यामुळे तो शेवटपर्यंत अविवाहित राहतो. पद्माकर आणि कमला यांचा प्रेमविवाह होतो. ही सर्व स्थित्यंतरे समाजात घडून येत असून त्यांचा पुरस्कार हरिभाऊंनी कळकळीने केला आहे.

पहिल्या पंधरा वर्षात हरिभाऊंनी लिहिलेल्या कादंबऱ्यातून प्रामुख्याने स्त्रियांचे प्रश्न हाताळले आहेत. मोठ्या तळमळीने चितारले आहेत. सरस्वती, अंबू, दुर्गा, यमू यांच्या हृदयद्रावक कथा कालातीत आहेत. पुढील कादंबऱ्यातून हरिभाऊंनी युवक हे केन्द्र कल्पून त्यांच्या आचारविचारातील बदल रंगविले आहेत. वस्तुतः ' मी ' पासूनच ही प्रवृत्ती आढळते. भाऊचा झालेला मानसिक विकास हा या कादंबरीचा गाभा. देशासाठी स्वार्थत्याग करून अविवाहित राहण्याचे, नव्हे, संन्यास घेऊन तरुणात जागृती उत्पन्न करण्यासाठी मठ स्थापन करण्याचे तो ठरवतो. मठ स्थापनेनंतर त्याने कोणते कार्य केले ? लोकशिक्षणाचे आणि लोकांची गाऱ्हाणी सरकारी अधिकाऱ्यांपर्यंत पोचविण्याचे. यावरून त्याकाळची देशसेवेची कल्पना स्पष्ट होते. तत्कालीन जहाल नि मवाळ पक्षाच्या तत्त्वज्ञानाचा विचार ' आजच ' आणि ' कर्मयोग ' या कादंबऱ्यात प्रामुख्याने आढळतो. गणपतरावचा मुलगा चंद्रशेखर हा ' कर्मयोग ' चा नायक, तर यशवंतराव हा ' आजच '







कादंबरीचा नायक. या दोन्ही कादंबऱ्या अपूर्ण असल्याने त्यातील हरिभाऊंची भूमिका पूर्णांशाने स्पष्ट झाली नाही. तरी काही प्रवृत्तीचे दिग्दर्शन या पात्रांद्वारे हरिभाऊंनी केले आहे. यशवंतराव हा जहालपक्षाचा पुढारी आहे. तो देशाभिमानी आहे. देशासाठी त्याग करण्यास तयार आहे. पण काय करावे हे त्याला कळत नाही. जुन्या सुधारकांचा मार्ग चुकीचा आहे एवढेच काय ते त्याला माहीत आहे. त्यांचा वीमोड करण्यास तो सिद्ध आहे. तथापि, लोकांनी कोणत्या नव्या मार्गाचा अवलंब करावा या विषयीच्या विधायक योजना त्याच्याजवळ नाहीत. 'आजच' मध्ये क्रांतिकारक प्रवृत्तीचा नारायणरावही दाखवावयास हरिभाऊ विसरले नाहीत. 'कर्मयोग' चा नायक चंद्रशेखर हा स्वदेशाभिमानी, स्वार्थत्यागी आहे. तो बापाप्रमाणे नास्तिक असूनही स्वामीजींच्या उपदेशाने तो अध्यात्मवादी कार्यकर्ता बनतो. अशा तऱ्हेने विसाव्या शतकारंभी महाराष्ट्रात जी वैचारिक लाट आली नि तिचा तरुणांवर जो प्रभाव पडला त्याचे मार्मिक दर्शन हरिभाऊंनी घडवले आहे.

अशा तऱ्हेने आपल्या सामाजिक कादंबऱ्यातून हरिभाऊंनी घडवलेल्या समाजजीवनदर्शनाचा विचार केला. येथे एक प्रश्न उपस्थित होणे संभवनीय आहे. तो असा की, समाजजीवन आणि साहित्य म्हणजेच ललित वाङ्मय याचा संबंध काय ? याचे उत्तर हेच देता येईल की, ललित वाङ्मयाचा समाजमनावर आणि समाजजीवनावर प्रत्यक्ष परिणाम झालेला कधीच दिसून येत नाही. किंबहुना तो होतच असला तर अप्रत्यक्षपणे आणि संथ गतीने होत असावा. याला अपवाद वृत्तपत्रातील लेखांचा. 'केसरी' तील टिळकांच्या लेखांनी आणि 'काळ' मधील शिवरामपंत परांजप्यांच्या लेखांनी जवढा लोकक्षोभ उत्पन्न केला तेवढा तर सोडाच पण त्याचा काही हिस्सादेखील काव्य, कादंबरी आणि नाटक यामुळे संभवत नाही. मात्र, ललित वाङ्मयाचा समाजजीवनावर प्रभाव पडत नसला तरी समाजजीवनाचा ललित वाङ्मयावर परिणाम होणे अपरिहार्य आहे. कारण कलावंताचे व साहित्यिकांचे मन अत्यंत संवेदनाक्षम नि संस्कारक्षम असते. अगदी छायाचित्रासाठी वापरण्यात येणाऱ्या 'निगेटिव्ह' सारखे असते. म्हणून वाङ्मयातून समाजमनाचे आणि समाजजीवनाचे प्रतिबिंब उमटलेले दिसते. प्रत्येक प्रतिभावंत साहित्यिकाला हा नियम लागू पडतो. मग हरिभाऊच तेवढे या नियमाला कसे बरं अपवाद असणार ?

( – नागपूर नभोवाणीच्या सौजन्याने )










श्री. ग. उ. थिटे

# मम्मट, विश्वनाथ आणि दोन काव्यशास्त्रीय मुद्दे

## प्रस्तावना

काव्यलक्षण व काव्यप्रयोजन हे मुद्दे संस्कृत-साहित्यशास्त्रातच नव्हेत, तर इतरही साहित्यशास्त्रात अत्यंत महत्त्वाचे व वारंवार चर्चिले गेलेले विषय आहेत. काव्य किंवा साहित्य म्हणजे काय, व ते कशासाठी ह्या दोन प्रश्नांच्या उत्तरात साहित्यशास्त्रातील इतर चर्चाही सामावल्या जाऊ शकतील इतके हे महत्त्वाचे मुद्दे आहेत. संस्कृतसाहित्यशास्त्रातील ग्रंथांची सुरुवात बहुधा ह्या विषयांच्या चर्चेनेच होते. ह्या विषयावरील मम्मट, विश्वनाथ ह्यांचा तौलनिक परामर्श घेऊन दोघांबद्दल एक विचार मांडण्याचा उद्देश ह्या लेखा-मागे आहे.

## काव्यलक्षण

मम्मट आणि विश्वनाथ ह्यांच्या साहित्यशास्त्र-विषयक भूमिकेत वास्तविक पाहतां काहीही फरक नाही. मम्मटाच्या काव्यप्रकाशाच्या धर्तीवरच विश्व-नाथाच्या साहित्यदर्पणाची रचना झालेली आहे हे स्पष्ट आहे. दुसरे म्हणजे विश्वनाथाने मम्मटाचे अनेक बाबतीत अनुकरण केले आहे, त्याच्या विवेचनाचा आश्रय घेतला आहे. क्वचित् मम्मटाने मांडलेलाच मुद्दा अधिक सुव्यवस्थित रीतीने विश्वनाथाने मांडला आहे. दोघांनीही ध्वनिकारांची परंपरा पुढे चालविली. रसाचे माहात्म्य दोघांनाही विवादातीतपणे मान्य आहे. रसाचे महत्त्व आणि स्वरूप ह्याविषयी आनंद-वर्धन व अभिनवगुप्त ह्यांनी पूर्वीच प्रतिपादन केले होते. त्यांची मतेच मम्मटविश्वनाथांनी आपल्या ग्रंथरचनेच्या सोयीनुसार मान्य केली आहेत व अनु-वादिलीही आहेत. त्यामुळे दोघांचाही पिंड सारखाच, मते सारखीच, आणि दोघांनाही प्रमाणभूत वाटणारे विद्वान एकच.

हे सगळे खरे; पण त्यांच्यातील काव्यलक्षणा-बद्दलचा विवाद पाहिला की आश्चर्याचा धक्का बसतो. विश्वनाथाने काव्यप्रयोजनाच्या चर्चेनंतर मम्मटाच्या लक्षणाचे कठोर परीक्षण केले आहे. आणि मम्मटाच्या काव्यलक्षणातील शब्द न् शब्द निरुपयोगी, अशास्त्रीय, अयथार्थ आहे हे त्याने दाखविले आहे.

## विश्वनाथकृत विवेचन

मम्मटाचे " तददोषौ शब्दार्थौ सगुणावनलङ्कृती " हे काव्यलक्षण तपासताना विश्वनाथ म्हणतो,— दोषरहित शब्दार्थ काव्यात असावेत हे म्हणणे अयोग्य आहे, कारण "न्यक्कारो ह्ययमेव" ह्या श्लोकात दोष असले तरी 'ध्वनी' असल्यामुळे ते उत्तम काव्य मानले गेले आहे. आता कुणी म्हणेल की येथे फक्त एकच अंश दूषित झाला आहे, सगळ्या श्लोकभर काही दोष नाही. पण हेही अयोग्य आहे. कारण ज्यात दोष आहे तो भाग अकाव्य ठरेल, व ज्यात दोष नाही, तो भाग काव्य ठरून ह्या रस्सीखेचेत हे काव्य वा अकाव्य काहीच ठरणार नाही.

शिवाय दोष काव्याचा एखादा भागच बिघडवतात, सगळे काव्य नाही, ही समजूत अयोग्य आहे. कारण दोष म्हटला की तो संपूर्ण काव्यालाच धक्का देतो. आणि दोष तरी कोणता ? तर काव्याचा आत्मभूत असा जो रस त्याच्या प्रतीतीला बाध आणणारा. अशा प्रकारचा बाध झाला नाही तर दोषच नव्हे. हे मम्मटालाही मान्य आहे. त्याने असे म्हटले आहे की मुख्यार्थहतिर्दोषः रसश्च मुख्यस्तदाश्रयाद् वाच्यः। म्हणजे मुख्य अर्थाला अर्थात् रसाला बाध आणतो तो दोष. त्यामुळेच काही दोष हे नित्य तर काही अनित्य ठरतात. जो एका रसाबाबत दोष ठरतो, तो दुसऱ्या रसात गुण ठरतो. उदा. शृंगाररसात श्रुतिकटुत्व हा दोष ठरेल, पण रौद्ररसात तो गुण ठरेल, हे सगळे मम्मटानेच स्वतः "इदानीं क्वचिददोषा अप्येते उच्यन्ते" अशी प्रस्तावना करून उत्तम विवेचन-पूर्वक सांगितले आहे. शिवाय निर्दोष तेच काव्य म्हटले तर कालिदासादी महाकवींच्या (ज्यांच्या महाकवित्वाबद्दल दोन्ही पक्षात विवाद नाही )

काव्यातही दोष आढळतात. (ह्या बाबतीतही विवाद नाही) मग त्यांचे काव्य हे काव्य ठरणार नाही.

आता अदोषौ ह्या शब्दात नञचा अर्थ ईषद् असा घेतला, तर काव्यात थोडेसे (पण फार नव्हेत) दोष असणे आवश्यक होऊन बसेल. आता असे म्हणाल की "असा शब्दच्छल नका करू. काव्यात दोष नसावेतच, पण असलेच तर थोडे असावेत." तरी तुमचे समर्थन लंगडे आहे. कारण काव्याचे काव्यत्व ठरवण्यात त्यातील दोष असणे किंवा नसणे ही मुळी कसोटीच नाही. दोष असले तर काव्य कमी किंमतीचे ठरेल, नसले तर अधिक किंमतीचे ठरेल. म्हणजे दोष काव्याची किंमत ठरवतात, काव्यत्व नव्हे. काव्यत्व ठरवण्यासाठी दुसरा काही विचार करावा लागेल. रत्नावर डाग असेल, किंवा त्याला 'माशी लागली' असेल तर त्यामुळे आपण रत्न स्वीकारणार नाही किंवा त्याची किंमत कमी करू, पण त्याचे रत्नत्व नष्ट करता येणार नाही. त्याचप्रमाणे दोषांमुळे काव्यत्व निर्धारण होत नाही; तर उपादेयतारतम्य ठरते.

काव्यलक्षणातील सगुणौ हा शब्दही अयोग्य आहे. कारण गुण हे रसाचे धर्म आहेत, हे मम्मटालाही मान्य आहे. (ये रसस्याङ्गिनो धर्माः शौर्यादय इवात्मनः। उत्कर्षहेतवस्ते स्युः अचलस्थितयो गुणाः।') त्यामुळे गुणसुद्धा काव्यत्व स्वतंत्रपणे ठरवू शकत नाहीत. तर काव्यात रस असल्यास त्याचा उत्कर्ष करतात. आता जर असे म्हटले की "रस असल्यावर गुण असतात, नसल्यावर नसतात, म्हणून गुणयुक्त शब्दार्थांचा काव्यात वापर करावा असे सुचवावयाचे आहे. म्हणून सगुणौ ह्याचाच अर्थ रसवन्तौ" तरी ते योग्य नाही. "प्राणिमन्तो देशाः" असे म्हणावयाचे असेल तर कुणी "शौर्यादिमन्तो देशाः" म्हणत नाही. अलंकार हे सुद्धा रस असेल तर त्या अंगीभूत रसाची शोभा वाढवतात. काव्यत्वनिर्धारण नाही. त्यामुळे "अनलङ्कृती पुनः क्वापि" ह्या शब्दांनी काव्यात अलंकार असावेत हे जे सुचवले आहे, ते योग्य नाही हे दिसून येईल.

## विश्वनाथाचे काव्यलक्षण व त्याचे परीक्षण

विश्वनाथाने "वाक्यं रसात्मकं काव्यम्" असे लक्षण केले आहे. ह्या संदर्भात लक्षात घेण्याजोगी सर्वात महत्त्वाची गोष्ट अशी की काव्याचा रस हाच आत्मा आहे ह्याबाबत कुणाचाही मतभेद नाही. (काव्यस्यात्मन्यङ्गिनी रसादिरूपे न कस्यचित् विमतिः) भरतमुनी, अग्निपुराण, आनंदवर्धन, अभिनवगुप्त, खुद्द मम्मट, जगन्नाथपंडित, हेही काव्याचा आत्मा कोण असा प्रश्न विचारल्यावर "रस" हेच उत्तर देतील. म्हणजे एका दृष्टीने विश्वनाथाने विवाद्य किंवा नवीन काही सांगितले नाही. पण दुसऱ्या दृष्टीने विश्वनाथाचे वैशिष्ट्य व एकमेवत्व दिसते. कारण काव्याचा रस हा आत्मा, गुण हे शौर्य इ. प्रमाणे, अलंकार हे कटककुंडलाप्रमाणे, रीती अवयवसंस्थानाप्रमाणे इत्यादी रूपक वरील विद्वानांना मान्य असूनही त्यांची लक्षणे निरनिराळी आहेत व लक्षणात रसाचा समावेश कुणीही करीत नाही.

ह्या उलट विश्वनाथाच्या लक्षणाचा भावार्थ मान्य असूनही केवळ तर्कदृष्ट्या लक्षण ह्या संज्ञेस ते पात्र नाही हे सिद्ध करण्याकरिता जगन्नाथाने वाद घातला आहे. तो म्हणतो– "साहित्यदर्पणात रसवत् तेच काव्य हे जे म्हटले, ते अयोग्य आहे. कारण त्यामुळे वस्त्वलङ्कारप्रधान काव्य हे काव्य ठरणार नाही. महाकवींनी तशी काव्ये केलेली आहेत. जलप्रवाहादिकांची वर्णने केली आहेत. त्यात रस नसला तरी त्यांना काव्य म्हणणे भाग आहे. तेथेही रस आहेच असे म्हणता येणार नाही. कारण मग तसला रससंबंध "गौश्चलति" "मृगो धावति[१]" ह्या वाक्यांसही जोडून त्यांना काव्य म्हणावे लागेल.

## आधुनिकांच्या प्रतिक्रियांचे समीक्षण

आधुनिक टीकाकारांनी मम्मट आणि विश्वनाथ ह्यांची लक्षणे तपासली आहेत. पण त्यात मम्मटाचे

१. यत्तु साहित्यदर्पणे रसवदेव काव्यमिति निर्णीतं तन्न । वस्त्वलङ्कारप्रधानानां काव्यानामकाव्यापत्तेः। न चेष्टापत्तिः । महाकविसम्प्रदायस्याकुलीभावप्रसङ्गात् । तथा च जलप्रवाहवेगगतिपतनोत्पतनभ्रमणानि कविभिर्वर्णितानि । न च तत्रापि यथाकथाचित् परम्परया रसस्पर्शोऽस्त्येवेति वाच्यम् । ईदृशरसस्पर्शस्य गौश्चलति मृगो धावति इत्यादावति प्रसक्तत्वेनाप्रयोजकत्वात् ।



अनुक्रमणिका






कसेबसे समर्थन करण्याचा कमालीचा आटापिटा दिसतो. जणू काही मम्मट हा त्यांचा जावईच! असत्पक्षाची वकिली करण्याचा त्यांचा हा खटाटोप का ह्याचा उलगडा होत नाही. मम्मटाच्या काव्य-लक्षणात वास्तविक असे काहीही नाही की ज्यामध्ये काहीतरी काव्यलक्षण म्हणून तथ्य आहे.

डॉ. सुशीलकुमार दे Some problems of Sanskrit Poetics ह्या पुस्तकात मम्मटाच्या काव्यलक्षणाचे समर्थन करताना म्हणतात की, "मम्मटाच्या[2] लक्षणावर ज्यांनी प्रहार केले त्यांची स्वतःची काव्यलक्षणेसुद्धा तसल्या प्रकारच्या टीकेस पात्र होऊ शकतील." ह्या बाबतीत हे स्पष्ट आहे की इतरांच्या काव्यलक्षणात दोष असल्याने मम्मटाच्या लक्षणात दोष नाहीत हे सिद्ध होत नाही; आणि मम्मटाच्या लक्षणातील दोषही कमी होत नाही. ते पुढे म्हणतात की "विश्वनाथ मम्मटाला उपजीव्य[3] मानतो. पण त्याच्या (मम्मटाच्या) काव्यलक्षणावरील प्रहारांनी आपल्या ग्रंथांची सुरुवात करतो" पण विश्वनाथाचा मम्मट हा उपजीव्य असल्याने त्याने मम्मटाच्या चुका ह्या चुकाच नाहीत असे म्हणावे असे नाही. आणि समजा उपजीव्याविशयी आदर असावा व त्याला विरोधी टीका विश्वनाथाने करू नये हे विश्वनाथापुरते योग्य मानले तरी त्यामुळे मम्मटाचे दोष लपत नाहीत व मम्मटाचे समर्थन होऊ शकत नाही.

महामहोपाध्याय काणे ह्यांनीही विश्वनाथाच्या मम्मट-लक्षणावरील परीक्षणात खरे म्हणजे एकही दोष काढून दाखविला नाही. तरी विश्वनाथाला नुसतीच दूषणे दिली आहेत. काणे म्हणतात, "विश्व-[4] नाथाचे आक्षेप फारच कठोर आहेत. विश्वनाथ हा आपल्या पूर्वसूरींची टिंगल करून आपल्या ज्ञानाचे प्रदर्शन करू पाहात आहे."

पण हा काय आक्षेप झाला? विश्वनाथाने खरे म्हणजे टिंगल केलेली नाही. काही ठिकाणी उपहास वाटण्याची शक्यता आहे असे म्हणता आले तरी संस्कृत शास्त्रीय ग्रंथांमध्ये वारीकसारीक मुद्दे मांडून पूर्वोत्तरपक्ष करण्याची, "कृत्वाशंका" काढून वाद करण्याची जी नेहमीची पद्धत आहे तिला धरूनच विश्वनाथ बोलतो आहे. विश्वनाथापेक्षाही कठोर प्रहार केल्याची उदाहरणे इतरत्र कितीतरी सापडतील. त्यातून समजा विश्वनाथाची टीका अतिशय तीक्ष्ण आहे हे कबूल केले तरी टीकेची पद्धत तीक्ष्ण असल्याने त्या टीकेचा भावार्थ हा उपेक्षणीय ठरत नाही; किंवा चुकीचा ठरत नाही. आणि विश्वनाथाने केलेल्या विवेचनात काणे ह्यांनीही कोणताही दोष काढलेला नाही हे वर म्हटलेच आहे.

पण काणे ह्यांची ह्यापुढील मम्मटाचे समर्थन करणारी वाक्ये अधिक ध्यानात घेण्याजोगी व आश्चर्यकारक आहेत. काणे विनाकारण मम्मटाचे समर्थन का करतात व विश्वनाथाचे म्हणणे कितीतरी उजवे, शास्त्रीय, कमी विवाद्य असतानाही त्याला वाईट का ठरवतात हे कळणे अशक्य आहे. काणे

2. From the purely theoritical point of view, Mammata's definition of poetry was subjected to much criticism although his critics were writen whose own definitions were not entirely above such criticism some problems of Sk. Poetics. by i. e. p. 119.

3. Viśvanatha, for instance, undoubtedly takes Mammata's work as the basis ( उपजीव्य ) of his own, but begins his Sahityadarpana with a vigorous attack on Mammata's definition.

– Some problems ... i. e. p. 119.

4. As to these objections one cannot help saying that विश्वनाथ is here overfastidious and is perhaps actuated by the desire of making a show of his erudition by pouring ridicule upon a famous predicessor.

– काणे साहित्यदर्पण टीपा. पान १७.



अनुक्रमणिका






म्हणतात– मम्मटाचे[5] लक्षण सोपे आहे. चटकन् ध्यानात येऊ शकणारे आहे. प्रत्येकाला गुण, अलंकार, दोष इत्यादी माहीत असतात आणि त्यांचा समावेश कळून मम्मट आपल्या काव्यलक्षणाच्या योगे काव्याबद्दल काहीतरी स्पष्ट कल्पना करून देतो. पण विश्वनाथ आपल्याला त्याच्या लक्षणावरून काहीच कल्पना देऊ शकत नाही; कारण तो वाचकांना रसचर्चेच्या गहन अरण्यात नेऊन सोडतो. आणि एवढा प्रयत्न करून त्याचे लक्षणही इतरांना समाधान देणारे नाही."

हे सर्वच विवेचन हेत्वाभासात्मक आहे. मम्मटाचे लक्षण सोपे आहे. हा मुळी गुण होऊ शकतच नाही. मम्मट हा शास्त्रीय ग्रंथ लिहीत आहे. एखादे 'गाईड' लिहित नाही. शास्त्रीय ग्रंथात सोपेपणा आनुषंगिक असतो. सोपेपणा आला तर नको असे नाही. पण प्रथम शास्त्रीयता अवश्य हवी. शास्त्रीयतेची हेळसांड करून सोपेपणा हा गुण ठरू शकत नाही.

शिवाय दोष, गुण, अलंकार हे सगळ्यांना पूर्व-परिचित असतात वगैरे विधान फारच तर्कदुष्ट आहे. काव्यदोषांचे सूक्ष्मातिसूक्ष्म प्रकार, गुणांचे "त्रयस्ते न पुनर्दश" इत्यादी विवेचन, उपमा अलंकारातील व्याकरणपद्धतीने पाडलेल्या गणिती प्रकारांनी आलेली नीरसता व क्लिष्टता व इतर अलंकारातही असेच भेदोपभेद हे सर्व सुखग्राह्य आहे हे म्हणणे पटणे अशक्य आहे. आता जर असे म्हटले की "गुण, अलंकार, दोष ह्यांची सर्वसामान्य कल्पना (जरी सूक्ष्मज्ञान नव्हे तरी) प्रत्येकाला असतेच." तर रसाबाबतही हेच म्हणता येईल. रसचर्चा ही अत्यंत गहन असली तरी रसानुभव दुष्प्राप्य नाही. निरनिराळ्या प्रकारच्या काव्यवाचनाने येणारा अनुभव कशा प्रकारचा असतो ह्याची **स्थूल कल्पना** प्रत्येकाला असते. फक्त त्या अनुभवांचे तो सुव्यवस्थितपणे वर्णन करू शकणार नाही. ह्या दृष्टीने पाहता दोष, गुण, अलंकार ह्यांची सामान्य माहिती असण्यासाठीसुद्धा काही तरी साहित्य-शास्त्रीय परिभाषेचे ज्ञान हवे, वाचन हवे. पण रसाची सामान्य कल्पना अशिक्षित माणसालाही असू शकते. 'एकच प्याला' नाटक पाहताना एका डोळ्यात हसू व दुसऱ्या डोळ्यात आसू अशी अवस्था होते असे प्रेक्षक म्हणतो. रामकथा ऐकताना सामान्य मनुष्यही रडतो. त्या कथेतील कारुण्य तो जाणू शकतो. साने गुरुजींचे वाङ्मय करुण किंवा रडवे आहे हे साहित्य-शास्त्राचे ज्ञान नसलेलाही सामान्य वाचक सांगू शकतो. जाडया-रडयांचा चित्रपट विनोदी असतो हे सर्व-सामान्य माणसालाही कळते. हिच्कॉकचा चित्रपट भयानक असतो हेही त्याला कळते. मग अशा प्रकारची रसपरिपूर्णता ज्यात आहे ते चांगले काव्य असे तू समज अशी जर त्याला माहिती दिली तर तो काव्याचे स्वरूप, दोष, गुण, अलंकार ह्यांनी युक्त ते काव्य असे सांगितल्यानंतरच्यापेक्षा अधिक चांगल्या तऱ्हेने जाणू शकेल. म्हणजे रसानुभूती सामान्यालाही अधिक परिचित असते; (ह्या रसानुभूतीच्या प्रमाणात रसिकाच्या योग्यतेनुसार कमी-अधिकपणा राहील हे स्पष्ट आहे, पण त्याने प्रस्तुत मुद्याला बाध येत नाही) दोष, अलंकार इत्यादी सगळ्यांना माहीत असतात हे म्हणणे अयोग्य आहे.

मम्मटाचे समर्थन करताना असेही सुचवले जाते की त्याचे लक्षण हे "बाल" कवींना मार्गदर्शन करण्यासाठी आहे. (हे समर्थन गजेंद्रगडकरांनी सुचविले आहे. अर्थातच त्यांनी मम्मटाच्या लक्षणाला पूर्णपणे अशास्त्रीय, विसंगत ठरवले आहे. त्यामुळे

5. This much must be said in favour of Mammata that his definition has the merit of being simple and easily understood. Everyone is familiar with the words दोष, गुण, and अलंकार. By using them Mammata conveys a tolerably clear and accurate idea of the character of poetry. विश्वनाथ ...... in the quest of a scientifically accurate definition introduces his reader into the thorny jungle of Rasas. After all this trouble his definition itself has not satisfied other critics.

– काणे साहित्यदर्पण टीपा पान १७.



अनुक्रमणिका

त्यांना या समर्थनात कोणताही अभिनिवेश किंवा मम्मटाबद्दल प्रेम अभिप्रेत नाही हे स्पष्ट आहे. परंतु मम्मटाचा अकारण पक्षपाती ह्या मुद्यावर जोर देण्याची शक्यता आहे म्हणून त्याचा परामर्श.) ह्याला उत्तर असे की कवी बाल असो, प्रौढ असो त्याने " सर्वथा रसपरतन्त्रेण भाव्यम् " हाच त्याला उपदेश असतो. रससिद्धी होण्याची शक्यता दिसू लागल्यावर मग गुण, दोष, अलंकार ह्यांकडे पाहावे असे सांगता येईल. आणि त्यापेक्षाही महत्त्वाचे असे की काव्य कसे करावे ह्या विषयीचे पाकशास्त्रसदृश "गाईड" वाचून कुणी कवी होत नसतो. काव्य-निर्माणक्षमता एखाद्या व्यक्तीजवळ आहे ह्याचाच अर्थ काव्याची समुचित शब्दार्थात अभिव्यक्ती करण्याचे सामर्थ्य त्याच्याजवळ आहे. अर्थातच व्यक्तिमत्त्वाच्या भेदानुसार काव्याचा बाह्य आकार, त्यातील गुण, निर्दोषता, अलंकार ह्यांची सफाई कमी-अधिक असेल. पण तेवढ्याने काव्याचे खरे अन्तर्गत तत्त्व फारसे बिघडत किंवा सुधारत नाही. कवी हा काव्य करता करताच स्वतःच **काव्ययोगसंसिद्ध** होत असतो. त्याला उपदेशाची गरज नसते.

मम्मटाच्या काव्यलक्षणविचारात अर्वाचीन पंडितांनी विनाकारण त्याचे समर्थन करून मूळची अशास्त्रीयता अधिक वाढवली आहे हे आता स्पष्ट झाले असे म्हणावयास हरकत नाही. काव्यशास्त्राच्या इतिहासातील जे "Pioneers" त्यांनीच हे केल्यामुळे त्यांचा अनुवाद करणारे इतर पंडितही त्यांमागे जातील ह्यात आश्चर्य नाही. पण खरे आश्चर्य आहे ते मम्मटाबाबतच. मम्मट हा स्वतः ध्वनिवादी व रसप्राधान्य मानणारा आहे. काव्याचे उत्तम, मध्यम, अधम हे प्रकार तो ध्वनितत्त्वानुसार करतो. पण गुण, दोष, अलंकार ह्यांची व्यवस्था तो रस-संप्रदायानुसार करतो. ध्वनिसंप्रदाय व रससंप्रदाय हे खरे म्हणजे निराळे नव्हेत. कारण रस हाच सर्वात महत्त्वाचा हे ध्वनिसांप्रदायिकही मान्य करतात; इतकेच नव्हे तर रसाला योग्य तो मान देण्याचे मौलिक कार्य सामर्थ्यपूर्वक जर कुणी केले असेल तर ते ध्वनिवाद्यांनीच. मम्मटाने ध्वनिसंप्रदाय स्वीकारून रसध्वनी हा त्यातल्या त्यात महत्त्वाचा हे सांगून त्यानुसार जर काव्यलक्षण व काव्यविवेचन केले असते तर सर्व काही ठीक झाले असते. त्यामुळे खरे पाहता मम्मटाच्या हातून असे सदोष, अशास्त्रीय लक्षण कसे झाले हेच आश्चर्यकारक आहे. त्यामुळे मम्मट ज्या गावाला जायचे आहे त्याचे तिकीट न काढता दुसरेच काढीत आहे असे वाटते. हा एक प्रमाद आहे, अनवधानाने झालेली गोष्ट असेल हे आपण समजून घेऊ शकू; पण काव्यशास्त्रात मम्मटाच्या लक्षणाने फारच गोंधळ करून ठेवला. कारण मम्मटाचे महत्त्व व कर्तृत्व फार लक्षणीय आहे. त्या दृष्टीने त्याला फार अर्थ प्राप्त होतो.

## उपसंहार

विश्वनाथाचे काव्यलक्षण लक्षणाच्या न्यायशास्त्रीय अर्थाने कदाचित् थोडे उणे असेल, जगन्नाथाने विश्वनाथाच्या लक्षणावर घेतलेला आक्षेप उपेक्षणीय नाही हे खरे. आजच्या काळात सगळी रसचर्चाच अडगळीसारखी आहे अशी टीका होत आहे हा मुद्दाही विसरण्याजोगा नाही. (अर्थातच तो विवाद्य आहे, व त्यातून काही मरीव हाताशी लागेपर्यंत रसाचे महत्त्व सनातनी लोक व पुरोगामी लोकही अप्रत्यक्ष रीत्या मान्य केल्याशिवाय राहत नाहीत हा निराळा भाग आहे.) पण विश्वनाथाचे लक्षण शब्दशः नव्हे, तरी त्याचा भावार्थ सामान्यपणे संस्कृत साहित्य-शास्त्राचा संपूर्णपणे प्रतिनिधी मानता येईल इतका महत्त्वाचा आहे. आनंदवर्धन, अभिनवगुप्त, मम्मट, इत्यादी पूर्वसूरींच्याही तात्पर्याशी त्याचा भेद नाही. इतर बाबतीत वाद घालणारे महिमभट्टादी पंडितही रसाला आत्मा मानण्यात विरोध करीत नाहीत. वक्रोक्ती, रीती इत्यादी हे काव्याचे आत्मे म्हणणा-ऱ्यांचे पंथ नामशेष झाले. अग्निपुराणानेही रसाला काव्याचा आत्मा मानल्याने श्रुति-स्मृति प्रामाण्यवादी संस्कृतसाहित्यकार रसवादीच बनतात. ह्या दृष्टीने पाहता विश्वनाथाचे काव्यलक्षण संपूर्ण संस्कृत-साहित्यशास्त्रात अनन्यसाधारण महत्त्वाचे आहे; त्याचे प्रतिनिधित्व करणारे आहे, ही गोष्ट जितक्या लक्षपूर्वक पाहावयास हवी होती तितकी ती गेली नाही हाच खरा दुःखाचा भाग आहे. उलट मम्मटाच्या लक्षणात काडीमात्र गुणवत्ता नाही. त्याच्या लक्षणाचे समर्थन व विश्वनाथाच्या लक्षणाचे अवमूल्यांकन ही अन्यायकारक आहेत असा अभिप्राय व्यक्त करावयाचा आहे.



अनुक्रमणिका

भाई माधवराव बागल

# -- जे. पी. नाईक

पहाताच वाटावे कोणीतरी बेकार माणूस आपल्या समोर उभा आहे! रॉबिन्सन् क्रूसोचा अवतार! कपडे मळलेले! गळचाच्या कॉलरीने मूळचा रंग टाकून दिलेला! केस पिंजारलेले! दाढीला वस्तऱ्याची भेट केव्हा पडली असेल कोण जाणे! दाढीचे खुंट, कुठे जास्ती कुठे कमी! एखादा पुंजका रेझरच्या भेटीसाठी पुढे झालेला! लांडा शर्ट! मनगट मारामारीच्या तयारीत! शर्ट ढोपरावर सरकलेला! खाली लांडी चड्डी! आपण तरी शिष्टाचार सोडू नये म्हणून निसर्गाने केसाचे आवरण, सर्व शरीरावर टाकलेले! वेळ मिळाला की चड्डीच्या खिशात कोंबलेले शेंगदाणे बाहेर निघणार! पायात पायतानांची दिशा काय आहे हे पाहण्याकरता ओणवे न झाल्यामुळे, नको हा सहवास असे वाटून त्यातल्या वाद्या परस्परांपासून अलग होण्याची धडपड करीत असलेल्या!

ही स्वारी उतरली मोटारीतून! भाड्याचे पैसे काय ते विचारलेही नाही. चड्डीत हात घातला आणि काही नोटा ड्रायव्हरच्या हातावर टाकल्या, अन् परत मोड न घेताच त्याची रवानगी केली.

*　　*　　*　　*

आज अखिल भारताच्या शिक्षण क्षेत्रात क्रांतिकारक बदल घडवून आणणाऱ्या कमेटीची, ही व्यक्ती सेक्रेटरी आहे. आणि ही जागा त्यांची पात्रता अजमावून भारताचे शिक्षणमंत्री ना. छगला यांनी त्यांना दिली.

या अगोदर त्यांना या पूर्वीचे शिक्षणमंत्री हुमायून कबीर यांनी आपले सल्लागार व ऑनररी सेक्रेटरी म्हणून जवळ केले होते.

कोल्हापूरला रीजन्सी कौन्सिलचा कारभार होता. त्यावेळी हेच कौन्सिलचे चीफ् सेक्रेटरी होते. व पडद्याआड राहून राज्याची सूत्रे हीच व्यक्ती हालवीत होती.

त्यावेळच्या रीजन्सी कौन्सिलचे शिक्षणमंत्री रा. ब. पी. सी. पाटील आपल्या आत्मचरित्रात लिहितात, "मी, जे. पी. नाईकांना बोलावून घेतले. विचारले, 'तुम्ही सेक्रेटरी म्हणून माझ्या हाताखाली याल काय?' ते म्हणाले, 'मला महिन्यातून तीन दिवस रजा मिळाली पाहिजे. भूमिगत असताना मी एक प्राथमिक शाळा धारवाडजवळ उघडली होती, तिच्या व्यवस्थेसाठी मला कधी कधी जावे लागेल. सतरा अठरा रुपये पगार मला पुरे होईल. माझी शाळा पाहून यावयास मला १७।१८ रुपये बस होतील!' 'अहो पण तुम्हाला जेवायला लागत नाही काय?' ते म्हणाले, 'आता मी कोठेतरी जेवतोच.'

—नाईक कामात फार दांडगे. त्यामुळे ते सर्वांना हवेसे झाले. आमची कामे भराभर उठू लागली. यामुळे कौन्सिलच्या सर्व मंत्र्यांवर त्यांचे वजन पडले. म्युनिसिपालिटीत असताना नाईकांना चहा पाहिजे असला तर त्यावेळी त्यांच्याजवळ असलेल्या सर्व लोकांनाही चहा मिळे. आंबा खावासा वाटल्यास चार दोन आंबे न घेता चार दोन डझन घेऊन सर्वांना वाटणार. मुक्काम आफिसातच असे. ऑफिसात काम करीत राहात व तेथेच झोपतही. शेकडो माणसांकडून कामे करून घेण्यात नाईकांनी स्वतःचे कर्तबगारीने चैतन्य आणले."

*　　*　　*　　*

माझा व जे. पीं. चा संबंध आला तो मुख्यतः ते नगरपालिकेत काम करू लागले त्यावेळी. संस्थानी सरकारशी प्रजापरिषदेचा लढा यावेळी सुरू होता. मी प्रजापरिषदेचा नेता होतो. जे. पी. नगरपालिकेचे जवळ जवळ सर्वाधिकारी होते. त्यांनी शहरसुधारणा करण्यासाठी रस्तेरुंदीचा कार्यक्रम हाती घेतला होता. जगदंबा देवालयाभोवतालच्या इमारती धडाधड पाडण्यास सुरवात केली होती. महाद्वाराच्या समोरचा रस्ता रुंद करण्याचे काम सुरू केले होते.

आम्हाला जे. पीं. च्यावर हल्ला करायला ही संधी चालून आली होती. जे. पी. तर सरकारचे







नोकर म्हणून मी बिंदु चौकाच्या व्यासपीठावरून जे. पीं. च्या वर टीकेची झोड उठविली.

'हा गृहस्थ कोल्हापूरचा विध्वंस करायला उठला आहे. लोकांच्या भावनेची याला जरासुद्धा कदर नाही! ही हुकूमशाही, हा जुलूम आमच्या हाती सत्ता आल्या-खेरीज बंद पाडता यणार नाही' अशा अर्थाची जहरी टीका सारखी सुरू केली. ती ऐकून जे. पी. माझ्या घरी आले व अगदी केविलवाणा चेहरा करून म्हणाले. 'भाईजी खरंच सांगा, असं काय वाईट करतो आहे मी ? ही सुधारणा जर कठोरपणे केली नाही तर शहरची कोंदट गलिच्छ वस्ती केव्हा तरी काढून टाकता येईल काय ? '

मी म्हणालो, 'हे पहा, जे. पी. हे सर्व खरं, हे मला काय समजत नाही ? पण तुमची स्तुती करणे, म्हणजे सरकारचा भाव वाढवणे असे होणार आहे ! जोपर्यंत लढा चालला आहे तोपर्यंत असे हे चालणारच. लढा संपला की आम्हीच तुम्हाला ते काम सांगू. '

यावर जे. पी. हसत सुटले. व मला दोन्ही हात जोडून नमस्कार केला व म्हणाले, 'माधवरावजी, आता माझे काही म्हणणे नाही. मनात तुम्हाला पटते ना ? बस झाले ! मग आता माझे काम थांबवायचे काहीच कारण नाही. मग लोक कितीही टीका करोत अन् रागावोत '.

वस्तुतः जे. पीं. नी राक्षसी धडाडीने हे काम केले नसते तर आजचे कोल्हापूर दिसलेच नसते. देवालया-समोरील त्या भव्य रस्त्यामुळे गावात आता स्वच्छ निरोगी हवा खेळू लागली आहे. शहराला आधुनिकता प्राप्त झाली आहे. देवालयाजवळील घाण गेल्यामुळे आरोग्याची वाढ झाली. आज सर्वच लोक त्यांना नावाजतात. जे. पीं ची ही कामगिरी नगरपालिकेच्या इतिहासात अविस्मरणीय होऊन राहिली आहे.

यानंतर त्यांचा माझा संबंध अगदी जवळचा—संबंध— आला व वाढत गेला तो कोरगावकर ट्रस्टमुळे. त्यांनी रात्रंदिवस काम करून संस्थेची ठाकठीक करून दिली. अनेक व्यवहार सुरळित करून दिले. काही डबघाईस आलेल्या कुळांना पुनः कर्ज द्यायला लावून, कर्जफेड करण्यास नेटके केले. वैद्य यशवंतराव गुणे यांचा औषधी कारखाना हे त्यापैकी ठळक उदाहरण होय. ऑफिसलाच त्यांनी आपले घर केले होते. वेळेचा विचारच कधी केला नाही. काम करून थकले म्हणजे त्याच गादीवर झोपत. जागे झाले म्हणजे कामाला लागत. मध्यान्ह असो की पहाट असो.

प्रभाकरपंतांच्या घरोब्यामुळे जे. पी. ही माझे स्नेही बनले. माझ्या घरच्या अडीअडचणीकडे आपु-लकीने पाहू लागले. मन घालून जातीने अक्ष देऊ लागले.

'जीवनप्रवाह' या माझ्या आत्मचरित्राची सूची स्वतः बसून, दुसऱ्यांना कामास लावून तयार करून घेतली. त्या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ स्वतः पुढाकार घेऊन घडवून आणला. आमंत्रणे स्वतः पाठवली. सारी व्यवस्था करून पुन्हा स्वागतासाठी दारावर उभे राहिले. हा समारंभ तर्कतीर्थ लक्ष्मण-शास्त्री जोशी यांचे अध्यक्षतेखाली पार पडला.

आणखी फार मोठी कामगिरी, सार्वजनिक तशी माझ्या जीवनाशी निगडित म्हणजे महात्मा गांधी यांच्या उभ्या पुतळ्याच्या संबंधीची. हा पुतळा बाबुराव पेंटर यांच्या निधनानंतर, त्यांच्याच घरी पडून राहिला होता. तो तेथून उचलून फर्लांगभर दूर पेडॅस्टलवर नेऊन ठेवणे, माझ्या अगर त्यांच्या वारसांना सोपे नव्हते. पुन्हा अॅडमिस्ट्रेटर समितीची बँकेतील रक्कम अडवून ठेवली होती. जे. पीं. नी सर्व जबाबदारी अंगावर घेऊन, कलेक्टर शेख यांची गाठ घेऊन, वरुणतीर्थाचे आत पेडॅस्टलपर्यंत रस्ता करण्यास त्यांच्या हस्ते पहिली कुदळ लावली. इंजिनियर खात्याचे सहकार्य मिळवून क्रेन आणवला, स्टाफ कामास लावला. पैसे मोकळे करून घेतले. कै. भाऊसाहेब हिरे रेव्हेन्यू मिनिस्टर यांच्या हस्ते होणाऱ्या उद्घाटन समारंभाची सर्व व्यवस्था नगर-पालिकेकडून करवून घेतली. जे. पीं. चे हे उपकार मला कधीही विसरता येणार नाहीत. त्याची विस्मृती त्यांना मात्र सहजी होऊ शकते.

यानंतर मौनी विद्यापीठाची जबाबदारी संस्थेचे संस्थापक व्ही. टी. पाटील व ट्रस्टींनी डायरेक्टर व जनरल सेक्रेटरी करून त्यांच्यावर टाकली. नेहमीच्या स्वभावाप्रमाणे त्यांनी त्या कामालाही सर्वस्वी वाहून घेतले. मध्यवर्ती सरकारकडून लाखो रुपये मिळवून

आणले. स्वतःचा पगारही त्यातच घातला. व एका रात्रीत नवसृष्टी करण्याच्या महत्त्वाकांक्षेने त्या पठारावर शैक्षणिक वसाहत उभी केली. छोटया मोठया इमारतींचा अफाट पसारा वाढवला. पण जे. पीं. ना तितकी कलादृष्टी नसल्यामुळे सौंदर्याच्या दृष्टीने त्यात भर पडली नाही. त्यांच्या खटपटी-मुळे तेथील लायब्ररी ही एक अमोल अशी संस्था निर्माण झाली. व संस्थेला अखिल भारतीय दर्जा प्राप्त करून दिला.

पण जे. पीं. च्यात विलक्षण खोड म्हणजे ते एका जागी कधीच चिकटून राहात नाहीत. त्यांच्या कर्तृत्वाला कोणतीही एखादी संस्था पुरी पडत नाही. त्यांची झेप सारखी पुढे जात असते. फुलपाखरा सारखी वृत्ती आहे त्यांची. पण भरारी गरुडाची.

मौनी विद्यापीठाचे काम करत असतानाच त्यांना दिल्लीचे शिक्षणमंत्री हुमायून कबीर यांनी आपल्या-कडे बोलावून घेतले ! आपले आनररी सेक्रेटरी व सल्लागार म्हणून राहण्याची विनंती केली ! मला महिन्यातून चार दिवस मौनी विद्यापीठाची व्यवस्था पाहण्याकरता मोकळिक देत असाल तर राहतो या अटीवर ते राहिले. विमानातून जाण्यायेण्याचा व किरकोळ खर्च यावर विनावेतन काम करू लागले. या दरम्यान सल्लागार राहूनही शैक्षणिक स्वरूपाचे अनेक ग्रंथ लिहिले.

मौनी विद्यापीठाच्या कार्यकारी मंडळाच्या बैठकी केव्हा ताराराणी विद्यापीठात तर केव्हा मौनी विद्यापीठात होत. अशा एका बैठकीवेळी मी जे. पीं. ना सहजी थट्टेत म्हणालो, 'जे. पी. तुमच्या दिल्लीला हजार खेपा होतात, माधवराव बागलाला त्याना केव्हा तरी'

जे. पीं. नी काहीच उत्तर दिले नाही. ते स्वस्थ बसले. मीही काही सीरियसली बोललो नव्हतो.

मौनी विद्यापीठाच्या दुसऱ्या बैठकीच्या अगोदर एकदोन दिवस मला जे. पीं. चे पत्र आले—'माधव-रावजी तुम्ही दिल्लीला जाण्याच्या तयारीनेच बैठकीला या, आपण तसेच बेळगावहून विमानाने दिल्लीस जाऊ. रहा वाटेल तितक्या दिवस. तुम्ही दिल्ली पाहून फार वर्षे झाली आहेत. तेव्हा नवी दिल्ली चांगली पहा. कंटाळा आला की परत जा'.

बैठक संपल्यावर तसेच दुपारी तीनच्या सुमारास आम्ही बेळगावला गेलो. विमान पकडले. आणि त्याच दिवशी रात्री ९।१० चे सुमारास दिल्लीला पोहोचलो. तेथे त्यांनी उत्कृष्ट जागा अगोदरच ठरवून टाकली होती. ते उच्च दर्जाचे हॉटेल होते. जेवणास प्रत्येक वेळीं १५।२० रुपये पडत. रोजची ३०।४० रुपये भाड्याची जागा होती. मला गावभर फिरवून आणण्याकरता १५।२० रुपये खर्च होई. हे ऐश्वर्य मी जे. पीं. च्या मुळे तोषीस न लागता भोगू शकलो. त्या मुदतीत मुरारजी देसाई, स. का. पाटील, जगन्नाथ-राव भोसले यांच्या गाठी घेतल्या. स. कां. च्या कंपौंडात एक सभा चालली होती. त्या सभेत त्यांनी मला बोलण्याची विनंती केली. जगन्नाथरावांनी जेवायला बोलावले. काकासाहेबांची फोनवरून भेट घेतली. त्यांनी चंदिगडला येण्याचे आमंत्रण दिले. आमचे जानी दोस्त खासदार र. के. खाडिलकर हे त्यावेळी तेथेच होते. त्यांनी जेवायला नेले. जनरल थोरातांना जे. पीं. नी चहाला बोलावले होते. मला शहर दाख-वण्याकरता जे. पी. नी आपल्या ऑफिसचा एक मद्रासी ऑफिसर बरोबर दिला होता. जे. पीं. चे ऑफिस पाहिले. त्यांच्या स्टाफचे त्यांचेबद्दलचे प्रेम, भक्ती व त्यांच्याकरवी त्यांची पात्रता अजमावता आली. त्यांच्या कर्तृत्वाची जो तो वाखाणणी करी.

विमानाचे तिकीट वेळेला मिळाले नाही म्हणून एअर कंडिशन डब्याने मला परत पाठवले. एकूण आमचा रुबाब बड्या अंमलदारासारखा ठेवला होता. जे. पीं. चे अगत्य, प्रेम, दिलदारी, त्यांची पात्रता, स्टाफवरचे वजन प्रत्यक्ष पाहता आले. अनुभवता आले, विशेष हे की आपण माधवरावसाठी अशी भावनाही त्यांच्या वागण्यातून वा बोलण्यातून नव्हती. इतर कोणाही मित्रासाठी त्यानी हेच केले असते. हा त्यांचा स्वभावच होता.

जे. पीं. ची एखाद्यावर मर्जी बसली म्हणजे त्याच्या-वर प्रेमाचा तसा उपकाराचा वर्षाव करतील. त्या भाराने तो कासावीस होईपर्यंत. मग आपण त्याचेवर किती खर्च केला याची जाणीव स्वतःलाच टंचाई












पडली म्हणजे कळून येणार. आपल्या खाजगी खर्चाचे ते टिपण ठेवीत असतील असे मला वाटत नाही. होईल तो खर्च. राहील ते खिशात. विश्वास टाकला म्हणजे त्याने अक्षरशः नागवले तरी त्यांना तशी शंका येणार नाही. उलट त्याचाच गुणगौरव करीत हिंडतील! मग जगाच्या दृष्टीने तो कितीका नालायक ठरेना ! हे प्रेम मग कोणावरही बसो, मित्रावर बसो, मैत्रिणीवर बसो, ती व्यक्ती दृष्टिआड झाली की ती जिवंत आहे की मेली याची विचारपूसही करणार नाहीत ! वर्षे गेली तरी दोन ओळी लिहिणार नाहीत. बायकोसुद्धा नजरेआड झाली तर आपले लग्न झाल्याचीही त्यांना आठवण होणार नाही ! संन्याशी व भोगी ! जणू स्थितप्रज्ञ !

याचा अर्थ ते कृतघ्न आहेत, निष्ठुर आहेत माणुसकीला पारखे आहेत असे मुळीच नाही.

ते भावनाप्रधान आहेत. कनवाळू आहेत. संकटात पडलेल्या कोणाही माणसाला निस्वार्थीपणे उपयोगी पडण्यास मागेपुढे पहाणार नाहीत. अनेक गोरगरीब विद्यार्थ्यांना त्यांनी मुक्त हस्ते मदत केली आहे. विलायतेपर्यंत पाठवण्याची व्यवस्था केली आहे. आपल्या मार्गदर्शनाखाली तयारी करुन घेऊन त्याना पी. एच्. डी करुन आणले आहे. पण स्वतः आहेत बी. ए. च.

लाखो रुपयाचे व्यवहार केले पण स्वतः कफल्लक राहिले. सारी महत्त्वाकांक्षा कार्य करण्याची.

जे. पीं. च्या अंगी देशाची सूत्रे चालवण्याची पात्रता आहे. पण निवडणुकीला उभे राहण्याची त्यांची वृत्ती नसल्यामुळे भारतात कोणत्याही जागेला लायक असलेला हा माणूस फक्त थोरामोठयाची पडद्याआडची शक्ती म्हणून राहिला आहे !

याच महिन्याचा किर्लोस्करचा अंक हाती पडला तो या व्यक्तिचित्राला अत्यंत पूरक असल्यामुळे त्यातील महत्त्वाचा भाग खाली देत आहे. 'शिक्षणाची दूरगामी रचना' या मथळयाखाली मो. ग. तपस्वी यांनी हा लेख लिहिला आहे.

१९६४ जुलैत नेमलेले शिक्षण मंडळ सर्वच दृष्टीने आगळे आहे. 'युनेस्को' सारख्या जगमान्य संस्थेमार्फत यातील सभासदांची निवड करण्यात आली आहे. भारतातीलच नव्हे तर जगातील नामांकित शिक्षणतज्ञ त्याचे सभासद आहेत. अमेरिकेतील कॅलिफोर्निया विद्यापीठाच्या संशोधन शाखेचे डीन, युनेस्कोचे माजी उपसरसंचालक जॉन रॉमस, मास्को विद्यापीठातील भौतिक शास्त्राचे प्राध्यापक टोकियो विज्ञान व तंत्रशास्त्र विद्याशाखेचे प्राध्यापक डॉ. जेम्स अलन, अमेरिकेच्या स्टेट एज्युकेशन डिपार्टमेंटचे कमिशनर व न्यूयॉर्क राज्य विद्यापीठाचे अध्यक्ष, ब्रिटनच्या उच्चतर शिक्षण समितीचे अध्यक्ष, अशी एकाहून एक मोठी मंडळी ज्या समितीत आहेत त्या समितीचे सर्वांना तळमळीने कार्यास लावणारी प्रेरणा आणि स्वतःच्या अविश्रांत परिश्रमाने तरुणांनाही लाजवणारे मंडळाचे सभासद चिटणीस जे. पी. नाईक हे होत.

त्यांनी रविवारची सुटी न घेता रोज १८।१८ तास काम केले. सकाळी आठपासून रात्री आठ पर्यंत. जेवण तेथेच ! पुनः रात्री ९ ते ११. स्टेनोग्राफर्सना डिक्टेशन.

श्री. व्ही. पी. स्मिथ निकोलस डेविट यासारखे परदेशी नामांकित तज्ञ, श्री. नाईक यांचा 'अलौकिक प्रज्ञेचा धनी' असा उल्लेख करतात. तर इतर परकीय तज्ञ एकमुखाने सांगतात की आमच्याकडे एका विषयाचा किंवा विषयशाखेचा तज्ञ म्हणून नावाजलेला असा अनेक व्यक्तींचा वर्ग आहे पण शिक्षणाच्या सर्व शाखोपशाखात सारख्याच अधिकाराने निवेदन आणि विवेचन करू शकेल अशी सर्वंकष व्यक्तिमत्त्वाची एकही व्यक्ती नाही. भारतातील जे. पी. नाईक ही मात्र तशी व्यक्ती आहे.

---

प्रा. सु. न. पेंडसे

# करुण हृदयाचा राजकवी ' कलापी '

वियोगी होगा पहला कवि
आहसे उपजा होगा गान
उमड कर आंखोसे चुपचाप
वही होगी कविता अनजान।

कलापी ( सूरसिंहजी तख्तसिंहजी गोहील ) ( इ. स. १८७४–१९०० ) हा सौराष्ट्रातील लाठी देशचा संस्थानिक राजा होता. कोमल हृदयाच्या ह्या तरुण राजकुमाराचे अंतःकरण करुण भावनेने भरलेले होते. तीव्र भावनांना सरळ शब्दात सांगणाऱ्या ह्या कवीचे गुजराथी साहित्यात एक विशिष्ट स्थान आहे. कलापीचे समग्र काव्य स्नेह व अनुकंपेने नुसते ओथंबलेले आहे. त्याच्या काव्यातून जगाबद्दलची त्याची सहानुभूती प्रकट होते. विश्ववात्सल्याचा असा दुसरा कवी गुजराथी साहित्यात झालेला नाही. भूतदया आणि विश्ववात्सल्याच्या कवितांचा संग्रह म्हणजेच **कलापीचा केकारव**. कोमल विश्ववत्सल, भग्न अंतःकरणाचे दुःख त्याच्या काव्यामधून वहाते. राजा आणि कवीचा हा योग श्री आणि सरस्वती इतकाच विरल आहे.

राजमहालात जगणाऱ्या ह्या राजकुमाराचे जीवन दुःखी होते. पांचव्या व चौदाव्या वर्षी कलापीवरचे आईवडिलांचे छत्र गेले, व त्या दुःखाने तो आयुष्यभर करुणरसिक व निराशावादी झाला. आठव्या वर्षी त्याने विद्याभ्यासाला सुरवात केली, परंतु इंग्रजी पाचवीपर्यंतच्या अक्षरज्ञानाशिवाय अन्य कोणतेच संस्कार किंवा शिक्षण त्याच्या बालमनाला मिळाले नाही. लहान वयातच झालेल्या आईवडिलांच्या मृत्यूव्यतिरिक्त सावत्र आई, व पुढे दोन पत्नींच्या संसारक्लेशात त्याची जीवनसरिता नीरस झाली. कलापीने महाविद्यालयीन शिक्षण घेतले नाही, तरी जानी मास्तर, हरिशंकर पंड्या, यांच्यासारख्या खाजगी साहित्यरसिक शिक्षकांनी घडविलेल्या इंग्रजी व संस्कृत साहित्याच्या अभ्यासाने; रुपशंकर ओझा, सरदारसिंग राणा, आनंदराव दवे, ह्यांच्यासारख्या सन्मित्रांबरोबरच्या काव्यगोष्टींमुळे गुजराथी-इंग्रजी भावकाव्यांच्या स्वतः केलेल्या वाचन-मनन-अध्ययनामुळे; तसेच मणिलाल, कान्त, गोवर्धनराम, बलवंतराय ठाकोर आदी विद्वानांनी कवितेसारख्या क्षेत्रात केलेल्या मार्गदर्शनामुळे कलापीचा साहित्यिक पिंड तयार झाला. कलापी जन्मापासूनच कोमल व भावनावादी अंतःकरणाचा होता. वात्सल्याला मुकलेले, स्नेहाकरिता तहानलेले त्याचे कविहृदय दुःखी असतानाच, त्यावेळेस लाठीमध्ये इतर नातेवाईकांच्या राज्यगादी मिळविण्यासाठी खटपटी चालल्या होत्या. त्यामुळे त्याचे विदीर्ण हृदय विरक्त झाले होते. परंतु दैवदुर्घटना अशी की त्याच वेळेस त्याचे रमा नावाच्या राजकुमारीशी लग्न होते, आणि जंगलात पळून जाण्याचा विचार करणारा हा राजकुमार रंगमंदिराच्या विलासामध्ये अडकतो. रमा सुंदर होती. स्त्रीसुलभ विलासात निपुण होती, त्यामुळे कलापी तिच्याकडे आकर्षला जातो. परंतु केवळ व्यवहार जाणणाऱ्या ह्या स्त्रीचे अंतःकरण कपटी होते, आणि त्यामुळे, तिने मोजून केलेल्या प्रेमाची जेव्हा त्याला जाणीव होते, तेव्हा त्याचे हृदय व्यथित होते, त्यामुळे त्याच्या काव्यात व्यथेचे भाव उमटतात. निष्काळजी विरक्ती, किंवा धिक्काराच्या भावना त्याच्या काव्यात प्रकट होतात.

कलापी काश्मीरच्या प्रवासाला निघाला तेव्हा त्याच्या कविदृष्टीला प्रसन्न निसर्ग पहावयास मिळाला; व लहानपणी तयार झालेला त्याचा साहित्यक रसिक आत्मा पुलकित झाला. बाण, कालिदास, किंवा वर्डस्वर्थ, थॉम्प्सन, आदी कवींच्या कवितेचे रसपान केल्यामुळे व स्वभावतःच प्रकृतीचे, निसर्गाचे शांत व रमणीय वातावरण प्रिय असल्यामुळे तो प्रकृतिसौंदर्याकडे ओढला जातो. त्याची बरीचशी काव्ये निसर्गाला उद्देशून आहेत.

'रमा' पासून विरक्त झालेले त्याचे मन मोंघी ( शोभना ) नावाच्या दासीकडे वळते–कलापीने प्रणयकाव्ये पुष्कळ लिहिली आहेत, परंतु त्याचे प्रेम रमा किंवा शोभनासारख्या विशिष्ट व्यक्तींमध्येच केंद्रित होत नाही. फक्त २६ वर्षाच्या त्याच्या आयुष्यात असाधारण मानसिक व आध्यात्मिक गुणसिद्धी त्याला प्राप्त झाली होती. प्रेम आणि तत्त्वज्ञानाची अभिरुची असल्यामुळे पुढे कलापीने संस्कृत आणि इंग्रजी साहित्यावरोबर उर्दू कवितेचा सुद्धा अभ्यास केला, आणि त्याने शिष्ट साहित्याचे वाचन व मनन चालू ठेवले. त्यामुळे त्याच्या काव्यामध्ये चिंतन वाढत गेले. स्वभावतः राज्यपद संभाळण्याची किंवा राज्यकारभार चालविण्याची त्याची वृत्ती नव्हती. त्यातून त्याच्या प्रणयभावनांवर कठोर आघात झाल्यामुळे दुःखी झालेल्या त्याच्या मनात पुनःपुन्हा विरक्तीचे विचार डोकावतात, तरी त्याच्या अंतःकरणात प्रणय–राग–इतका उत्कट असतो, की तो सहजपणे तृप्त होत नाही. रमानंतर त्याने स्वतःचे मन कितीही आवरले, तरी ते शोभनेकडे वळते आणि असेच शेवटपर्यंत त्याचे मन राग आणि त्याग ह्यामध्ये दोलायमान होते. राज्यकारभार एक कर्तव्यपालन म्हणून तो व्यवस्थित करीत असे, तथापि त्यात त्याचे मन रमत नसे, आणि शेवटी त्यागाचा पक्का निर्णय केल्यानंतर तो राज्यकारभारापासून मुक्त होणार, त्याच्या अगोदरच एका रात्रीचे भयंकर दुखणे भोगून फक्त २६ व्या वर्षी ह्या प्रणयपिपासू राजकवीने स्वतःची जीवनयात्रा संपविली.

कलापीच्या कविमानसाचा विकास असा झाला. कलापी स्वतःच्या काल्पनिक भावनागत सौंदर्य व स्नेहाच्या शोधात जीवनभर भटकला, परंतु त्याच्या सौंदर्याची व स्नेहाची व्यक्ती त्याला लाभली नाही. त्याच्या जीवनात आलेल्या स्त्रियांवर त्याने त्याच्या भावनांचे आरोपण करून पाहिले, आणि ह्या स्त्रियांमध्ये त्याला काही काळ तृप्तीचा भ्रम झाला, परंतु शेवटी त्याच्या अतृप्त मनाला निष्फळताच आली.

कलापीने लहानपणापासूनच कविता लिहिण्यास सुरुवात केली होती. सुरुवातीच्या त्याच्या कवितेमध्ये अन्य काव्यांचे अनुकरणच अधिक दिसते. त्याच्या सुरुवातीच्या कविता, नाटचगीते, पदे ह्यांच्या चालीवर, किंवा आर्या, गीती, मनोहर, गजल सारख्या मात्रा वृत्तांमधून रचलेल्या आहेत. 'काश्मीरमां वियोग', 'बीडीनो पीनार' सारखी काव्ये ह्याची उदाहरणे आहेत. ह्या काव्यात विषयभोगाची इच्छा, विरहदुःख, प्रियेचे सौंदर्यवर्णन, किंवा निसर्गवर्णन हेच विषय मुख्यतः येतात.

कोमळ वगर चूंटेल ने ताजा फुलनुं जेम
मध ले चूसी भ्रमर खूब उत्सुक हुं छुं तेम
तुज अधरामृत पानमां, तुज तृश ऊनी टाळ
तृशा पाई रससुंदरी, थई लगार दयाळ.

सारख्या पंक्तींमधून त्याचे रसपिपासू उत्सुक मन व्यक्त होते.

परंतु, हाडाचा कवी लवकरच ही अनुकरणवृत्ती सोडून स्वतःची मौलिकता प्राप्त करतो. कलापीचा सुद्धा छंद आणि निरूपणाचा कच्चेपणा एखाद वर्षाच्या आतच जातो, व वृत्त, शैली व निरूपणाच्या दृष्टीने त्याचे काव्य सुघटित होते. त्यात एक प्रकारची प्रवाहिता येते.

कलापीने कविता लिहिण्यास सुरवात केली तेव्हा गुजराथी भाषा पूर्ण विकसित नव्हती. 'दलपतकाव्य', 'नर्मकविता', 'कुसुममाळा', 'स्नेहमुद्रा' 'क्लान्त कवि', 'कुन्जविहार' आदी काव्यसंग्रहामधून; तसेच 'सुदर्शन', 'चन्द्र', 'बुद्धिप्रकाश', 'भारतीभूषण', 'ज्ञानसुधा', आदी नियतकालिकांमधून अर्वाचीन पद्धतीची नवीन काव्ये प्रकाशित होऊ लागली होती. ह्या अर्वाचीन कवींमध्ये दलपतराम, नर्मद, नरसिंहराव, गोवर्धनराम, मणिलाल, क्लान्त, हरिलाल ध्रुव, डाह्याभाई देरासरी, आदी कवी प्रसिद्ध होते. प्रेमानन्द वगैरेंची काव्ये जुन्या काळात मोजली जात. संस्कृतवृत्तांच्या प्रयोगाच्या बाबतीत गुजराथी काव्य तेव्हा प्राथमिक अवस्थेत होते. आणि नवीन युगाची, नवीन विषयांची व नवीन भाव व विचारांची दखल घेऊ शकेल, अशा परिस्थितीत तत्कालीन गुजराथी भाषा नव्हती. काव्यभाषाच नव्हे, तर वृत्ताची सुद्धा तीच गत होती. तत्कालीन कवितेवरून असे वाटत होते की, गुजराथी काव्यांना

संस्कृत वृत्तांमध्ये बद्ध करण्याच्या प्रयत्नात गुजराथी कविता स्वतःचे विशिष्ट , स्वाभाविक व स्वतंत्र रूप गमवून बसेल की काय; परंतु कलापीच्या बाबतीत त्याची अनुभवांची तीव्रता व उत्कट सिसृक्षा ह्या दोन कारणामुळे त्याला भाषा किंवा वृत्तांची अडचण भासली नाही. मात्रावृत्त, अक्षरवृत्त, गजल, वगैरे त्याच्या हातचे झाले होते, त्यामुळे,

होजो विद्युतसांकळी चळकती प्रेमार्द्र हैया विषे
स्पर्शे हर्ष जरी ज को हृदयने तो सर्वव्यापी बने—
(मरणशील प्रेमी)

किंवा,

अन्धारघोर विधुहीन निशानी शान्ति,
वा श्वेत दूध सम रेल रुडा शशीनी
(रसेच्छा)

—सारख्या सुंदर काव्यपंक्ती आपल्याला वाचावयास मिळतात. वसंततिलकाचा नादानुकारी, अर्थानुकारी छंदोलय आपल्याला ' रसेच्छा ' ह्या वरील काव्यात पहावयास मिळतो. भाषेचा इतका आंदोलनपूर्ण मधुर प्रसाद कलापीनंतर नान्हालालशिवाय दुसरा कोणीही कवी देऊ शकला नाही.

कलापीच्या काव्यात भाषेची प्रौढता, तसेच छंद, भाव व कथनाची प्रवाहिता दिसते. आणि मग त्याच्या सिद्धहस्त लेखणीतून,

ए भृंगना ज सहु वारस छो अहींयां
ए पद्मनी मधुरता बधी वारसो छे,
गुंजो उडो सुखथी सौ ज प्रवासमां आ
यात्रा पवित्र रमणीय स्थले स्थले छे.
(नवो सैको)

—सारख्या पंक्ती निघतात.

कलापी मुख्यतः कुतहलप्रिय आत्मलक्षी कवी आहे. वस्तुलक्षी कवीचे योग्य वस्तुनिरूपण, स्वभावनिरीक्षण, जीवनदर्शन आणि रचनाकौशल्य त्यांच्यात दिसत नाही. त्याची आत्मलक्षी काव्ये संस्कृतवृत्तामधून लिहिलेली भावकाव्ये, फारशी पद्धतीचे गजल, कांतासारखी मुक्तके, आणि विविध प्रकारची गेयपदेयांच्यामध्ये लिहिली गेली आहेत.

### भावकाव्य

कलापीचे श्रेष्ठ सर्जन, आणि गुजराथी साहित्यातील त्याची विशिष्ट भर असेल तर ते त्याचे भावकाव्य. कलापी गुजराथी साहित्याचा सर्वात समृद्ध भावकवी आहे. भावनांची तीव्रता आणि वास्तविकता, व घडलेल्या अनुभवांची साक्षात्कारिता त्याच्या काव्यात दिसते. कलापी हा विशुद्ध भावकवी आहे. निरंकुश भावना निखालसपणे त्याच्या भावकाव्यात व्यक्त होते. विप्रलंभाचे प्रबल व यथार्थ भाव त्याने कलात्मक पद्धतीने व्यक्त केले आहेत, आणि म्हणूनच ही भावकाव्ये उत्तम, रसात्मक काव्यांची सुंदर उदाहरणे झाली आहेत. उदा :—

फूटी गयेल घरनी घटमाळ जेवां
म्हारां फर्या वरसः जीवनवाग सूक्यो,
एके य बिन्दु नव चोवीश चक्रमाथी
वा कोई ये न घटमाळ समारनारुं
(जीवनहानि)

कलापीच्या भावकाव्यात चिंतनदेखील बऱ्याच प्रमाणात आहे. अनेक ठिकाणी त्याने रुदन गौण करून चिंतन प्रधान केले आहे, आणि त्याची बरीचशी भावकाव्ये चिंतनाच्या दीप्तीमुळे अधिक तेजस्वी झाली आहेत; परंतु कवीचा पिंड हा भावकवीचा आहे. हृदयाची कोमलता हा त्याचा प्राण आहे, आणि त्यातूनच त्याची काव्यसरिता प्रवाहित झाली आहे. ' मरणशील प्रेमी ', ' पुष्प ', ' आकाशने ', ' प्रिया कविताने ', . ' विधवा बेन बाबाने', ' अति मोडुं, ' ' एक धा ', ' पश्चात्ताप, ' ' ऋण ', ' एक ' इच्छा ', ' श्रद्धा ', ' चुंबन विप्लव ', ' शिकारीने ', ' उत्सुक-हृदय ', ' नवो सैको '—आदी त्याची उत्कृष्ट भावकाव्ये आहेत.

### गजल

कलापीने बरेच गजल लिहिले आहेत. त्यांची गणना आपण त्याच्या भावकाव्यामध्येच करू शकू. त्याच्या गजलांमध्ये त्याचे खरे व्यक्तिमत्त्व प्रतिबिंबित झाले आहे. स्वतःच्या जीवनात घडलेले खरे वास्तविक प्रसंग कोणत्याही प्रकारच्या संकोच किंवा आडंबराशिवाय त्याने निखालसतेने कथन केले आहेत. त्याच्या गजलांमध्ये जोम असून ते रसपूर्ण आहेत. त्याने फारशी शब्दांचा विपुल प्रयोग केला आहे. कलापीच्या गजलांमध्ये ऐहिक व आध्यात्मिक प्रेमाचे यथार्थ वर्णन आहे; व त्यामुळेच ते गुजराथी वाचकांचे

अत्यंत प्रिय आहेत. हृदयाच्या वेदना अत्यंत उत्कटतेने त्यातून व्यक्त झाल्या आहेत. उदा०–

ज्यां ज्यां नझर मारी ठेर यादी करी त्यां आपनी
आंसु मही ए आंखथी यादी झरे छे आपनी
माशूकोना गालनी लाली मही लाली अने,
ज्यां ज्यां चमन ज्यां ज्यां गुलो
त्यां त्यां सितारी आपनी,

अथवा,

पाणी बनी ढोळाऊं छुं, हुं दम-ब-दम गमने कुवे
अंधार छे, लाचार छुं,सिंचो-हवे सिंचो सनम।

–अशा काव्यपंक्तींमध्ये भावना आणि कल्पना परस्पराधिक सुंदर झालेल्या वाटतात. अर्थात् काही वेळा त्याचे खेळकर मनसुद्धा त्याच्या काव्यात डोकावते. उदा :–

हा! लाखरंगी इष्कनुं को एकरंगी जाम छे
मस्ताननां मस्तान एकुं जाम पीनारा हमे!

'आपनी यादी', 'तमारी राह', 'आपनी रहम', सनमनी शोध', 'सनमने', 'एक फेरफार', त्याग, इष्कनो बंदो, वगैरे त्याचे उत्तम गजल आहेत.

कलापीने मुक्तकाव्य देखील रचले आहे. त्याशिवाय गीते, पदे, लावण्या याची देखील रचना केली आहे. लघुकाव्यांमध्ये देखील त्याची भावनोत्कटता व्यक्त होते. 'प्रीतीनि रीत', 'प्रियाकविताने छेलुं 'आलिंगन', स्वप्ननो साद, पाणीनुं प्यालुं, वगैरे त्याची मुक्तके चांगली आहेत. त्याचे 'देशवटो' हे मुक्तक तर अत्यंत प्रसिद्ध आहे.

झरमर अबरे वरसे मोती
फूलडां आंखडीने खूणेथी
ए मुखडानुं वासी दिलडुं
देशवटो उदासी रे....
पाळेलुं पोषेलु पंखी
रणवगजमां मरतु झंखी
नाग गयो हैयामां डंखी
तलफी प्रेमप्रवासी रे...

पैकी, 'प्रिया कविताने छेल्लु आलिंगन', हे सुगेय व सुमधुर आहे. त्यात कवी कवितेबद्दलचे स्वतःचे प्रेम हृदयाचे अश्रू सारून व्यक्त करतो. **ह्याप्रमाणे भावगीते, गजल व मुक्तासारख्या काव्यप्रकारांमधून त्याचे आत्मलक्षी काव्य लिहिले गेले आहे.**

कलापीने बरीचशी वस्तुलक्षी काव्ये रचली आहेत. त्यात खंडकाव्य, महाकाव्य, आख्यायिका, आदी प्रकार त्याने हाताळले आहेत. रसनिरूपणाची शक्ती, प्रकृती, वर्णनाची चित्रात्मक कला आणि वस्तु-आलेखनाची विशिष्ट छटा ह्या तीन गुणांमुळे कलापीच्या खंडकाव्याचा गुजराथी साहित्यात वरचा क्रमांक आहे. नरसिंहराव, खबरदार, बोटादकर, यांच्यापेक्षा त्यांची खंडकाव्ये अधिक सुंदर असून संघर्षात्मक कथावस्तू घेऊन त्यातून तीव्र भावस्थिती प्रकट करणे, व त्याचे रसात्मक निर्वहन करणे ह्यात कलापीचे कौशल्य दिसते. खंडकाव्ये लिहिण्यात कान्तानंतर कलापीचाच दुसरा क्रमांक आहे, आणि कलापीच्या खण्डकाव्यांवर कान्ताच्या काव्यांचा परिणाम झाल्याचे दिसून आल्याशिवाय राहात नाही. तथापि त्या दोघांच्या खण्डकाव्यात मूलभूत फरक देखील आहे, आणि तो म्हणजे कान्ताच्या काव्यांमध्ये एक प्रकारची नाटचात्मकता दिसते, तर कलापीची खण्डकाव्ये ही केवळ कथनात्मक वाटतात. प्रकृतीचे संवादी व विसंवादी वर्णन करून त्यातून वेगवेगळे मानवी भाव प्रकट करणे व चिंतन आणि प्रकृती किंवा प्रसंगांच्या साहाय्याने त्यांना परमोच्चबिंदूपर्यंत पोचविणे, व नंतर भावनांचे उचित परिवर्तन घडवून त्या प्रसंगाचे सहानुभूतिपूर्वक वर्णन करणे– ही पद्धती त्याच्या खण्डकाव्यांमध्ये दिसते. कलापी मुख्यतः आत्मलक्षी असल्यामुळे, त्याच्या खण्डकाव्यांमधून व्यक्त होणारे रहस्य, प्रश्न, संघर्ष वगैरे त्याचे स्वतःचे व्यक्तिगत असावेत, असे वाटते. एवढेच नव्हे, तर बऱ्याच वेळेस कथेच्या प्रवाहात तो स्वतःचेच तत्त्वज्ञान किंवा चिंतन घुसडतो. त्यामुळे त्याची खण्डकाव्ये सुश्लिष्ट वाटत नाहीत. तथापि, बिल्वमंगल, हृदय-त्रिपुटी, प्रपात, भरत, वीणानो मृग, ग्राममाता, कन्या अने क्रौंच्च, सारसी इत्यादी त्याची खंडकाव्ये रस-वर्णन, भावनिर्वहन, मनोमंथन, संघर्ष व मुख्य म्हणजे प्रवाहिता–ह्या गुणांमुळे गुजराथी साहित्यात उत्कृष्ट खंडकाव्ये झाली आहेत. कलापीने महाकाव्य लिहिण्याचा देखील प्रयत्न केला. काव्य प्रकारा-सारखेच काव्यविषयांचे देखील वैविध्य आपल्याला

कलापीच्या काव्यसृष्टीत पहावयास मिळते. स्वभाव, त्याग, वैराग्य, वगैरे गोष्टी त्याच्या काव्याचे विषय झाल्या आहेत.

कलापीच्या प्रकृतिकाव्यावर कालिदासाच्या ऋतुवर्णनाचा व वर्डस्‌वर्थच्या प्रकृतिकाव्यांचा प्रभाव झाला आहे. निसर्गाचे शृंगारपूर्ण वर्णन देखील त्याने मोकळेपणाने केले आहे. प्रकृतीचा रंग, गंध, व रूपविलास त्याने उल्हासाने वर्णित केला आहे. प्रकृतिवर्णनात इन्द्रियानुभवी चित्रांचे दर्शन कीट्स-प्रमाणेच तो घडवितो, आणि त्या दृष्टीने तो गुजराथी साहित्याचा सर्वात मोठा इन्द्रियानुभव-रसिक ( sensuour poet ) कवी आहे. त्याच्या प्रकृतिचित्रांमध्ये इन्द्रियग्राह्यता आहे– तथापि प्रकृतीला कल्पनातरंगांनी सजविण्याची कला त्याला शेलेपासून प्राप्त झाली आहे. कलापी प्रकृतीसौंदर्याचा उपासक आहे. वर्डस्‌वर्थ त्याचा आवडता कवी आहे. प्रकृतीला पहाण्याची, त्याची वर्णन करण्याची रीती साधी, सरळ, भाषा, आणि त्यावरोबर साधा आदर्श आणि विश्वात्मवाद यांचे एकीकरण ह्या गोष्टी त्याने वर्डस्‌वर्थपासून घेतल्या आहेत. प्रकृतीला कलापी मानवी जगाच्या कुटिल व्यवहारापासून मुक्त होऊन शान्ती आणि प्रेरणेचे आनन्दस्थान निर्माण करणाऱ्या परमेश्वराचे प्रतीक समजतो, आणि म्हणून प्रकृतीच्या सौंदर्याव्यतिरिक्त त्यातून काही उच्च व गूढ अर्थ शोधून काढण्याचा त्याच्या कविमनाचा प्रयत्न दिसतो. कलापी निसर्गात स्वतःच्या जीवनाचे प्रतिबिंब पहातो, व त्यातून काही दिव्य संदेश उलगडण्याचा प्रयत्न करतो. निसर्गाचे त्याने स्थूल व सूक्ष्म वर्णन केले आहे. चिंतन आणि शब्दात्मक चित्रांकनाव्यतिरिक्त कलापीच्या प्रकृतिकाव्यांचे वैशिष्टय म्हणजे त्याची कोमलता होय. पुष्प, लता, एखादा जलप्रवाह, भ्रमर, पक्षी, आदी प्रकृतितत्त्वांचे वर्णन त्याने सौहार्दाने आणि नाजुकपणाने केले आहे. प्रकृतीच्या ह्या नाजुक अंगांबद्दल त्याच्या कोमल अंतःकरणाची भावव्यथा इतकी तीव्र आहे की जणू काही फुले खुडतानादेखील त्याचे हृदय विदीर्ण होत असावे.

प्रकृतीचे करुणार्द्र वर्णन हे त्याचे अद्वितीय वैशिष्टच होय. कलापीच्या प्रकृतिवर्णनात दृष्टी, स्पर्श, व ध्वनी साकार होतात. त्याच्यात रंगांचे वैभव आहे. उदाहरणार्थ–

(१) पूर्वे लाली चळकती दिसे आभमां केसुडांशी
(२) कोकिळ तणी कीकी समो रस
द्राक्षनो ढोळचो पणे
(३) ने चळकता फुलडां गुलावी वेरियां नभमंडपे
(४)त्या गार आछी चोकमां लीपी रुडी केसरतणी.

परंतु, कलापी प्रकृतिकविपेक्षाही मुख्यतः प्रणय-कवि आहे. संख्येच्या दृष्टीनेही त्याच्या प्रणयकविता सर्वात जास्त आहेत. त्याच्या जीवनाचा एक महत्त्वाचा सूर ह्या काव्यामधून व्यक्त झाला आहे. त्याच्या प्रणयकाव्यावर गुजराथी साहित्यरसिक मुग्ध आहेत.

सुरुवातीच्या त्याच्या प्रणयकाव्यांमध्ये कवीने प्रेमचाळेच वर्णित केले आहेत. त्यातून कवीची भोग-प्रधान, स्थूल दृष्टी व्यक्त होते. ' केलिस्मरण ' ह्या काव्यात शृंगाराचे देहनिष्ठ स्वरूप आपणास दिसते. विरहस्मरण, विषपान, ह्या काव्यांमध्ये त्याने स्पष्टपणे स्वतःची व्यक्तिगत प्रणयव्यथा मांडली आहे. कलापीचे रसिक व सौंदर्यमुग्ध जीवन असफल प्रणयाच्या झंझावाताने उध्वस्त झाले होते. त्याची प्रणयकाव्ये म्हणजे त्याच्या प्रेमानुभवांच्या विविध आवर्तनांचे आलापच होत. कलापीने स्वतःचा प्रणय भावगीते, गजल, मुक्तके, साहित्यिक खण्डकाव्यांमधून कथन केला आहे. कलापीच्या व्यक्तिमत्त्वात प्रणयी व कवी कलापी एकमेकात मिसळून गेले आहेत.

सुरुवातीच्या काव्यांमधून कलापीची दृष्टी स्थूल व भोगप्रधान आहे, व पुढे ती भोगप्रधान कमी झाली असली तरी त्यातून भोगप्रधानता अदृश्य झालेली नाही. त्याची देहरसिकता कमी झालेली नाही. त्याच्या काव्यात इन्द्रियानुगामितेचा ( Sensuousness ) स्पर्श शेवटपर्यंत राहिला आहे. भोग, मदनज्वर व देहसौंदर्याच्या वर्णनाव्यतिरिक्त त्याच्या प्रणयकाव्यां-मधून प्रणयपीडेचे जे विश्लेषण झाले आहे, त्यातून जे तीव्र व करुण वेदनांचे सूर उमटतात, त्यामुळे त्याची काव्ये विशेषतः तरुणांना मंत्रमुग्ध करतात. कलापीनेच स्वतःच्या प्रणयकवितांनी गुजराथी साहित्यरसिकांना प्रणयत्रिकोणाचे भान करवून दिले. ह्याप्रमाणे त्याची प्रणयकाव्ये गुजराथी साहित्यात







अत्यंत लोकप्रिय झाली. असतील, म्हणून ती काव्य-दृष्टीने उच्च दर्जाची आहेत असे समजण्याचे कारण नाही. तरी त्यातली काही खरोखर उत्तम काव्ये आहेत. 'सारखी', 'हृदयत्रिपुटी', 'प्रपात', ह्यासारखी प्रणयरसपूर्ण खण्डकाव्ये, 'एक फेरफार', 'माफी', 'खाकदिल' सारखी गजल, मरणशील प्रेमी, त्यागमां कंटक, विदाय, पान्थपंखीडुं, निर्वेद, अस्थिर मन, चुंबन विप्लव सारखी भावगीते– सर्व त्याची उत्तम प्रणयकाव्ये आहेत.

कलापीच्या प्रकृती व प्रणयविषयक काव्यांमध्ये चित्रात्मकता, सुरेखता, व सौन्दर्यमुग्धता आहे. प्रणयकवितेमध्ये भावनांचा ओघ हा विशेष गुण आहे. प्रणयरोमांच, प्रणयवैफल्य, संभोग व विप्रलंभ शृंगार, आदी त्याच्या काव्यात वर्णित झाले आहेतच, परंतु एका खऱ्या प्रेमवीराच्या अनुभवांची सत्यता प्रेमाच्या तत्त्वज्ञानाच्या स्वरूपात त्याने व्यक्त केली आहे. हे प्रेमनिरूपण अर्थातच सरल, वेगवती, प्रवाही व उत्कट भाषेत झाले आहे.

कलापीमध्ये लहानपणापासूनच वैराग्याची भावना प्रबल होत होती. त्यामुळे त्याच्या त्याग व वैराग्याच्या कवितेचा समूह देखील मोठा आहे. प्रभुश्रद्धा, धर्मजिज्ञासा, तत्त्वज्ञानाचा अभ्यास, त्यागी मनोदशा व त्याची अध्यात्मवृत्ती त्याच्या ह्या प्रकारच्या काव्यांमधून व्यक्त झाली आहे. 'प्रभु अनालापी गान', 'सनमने', 'सनमनी यारी', 'सनमनी शोध', 'वेचाऊं क्यां', 'आपनी रहम', 'स्वर्ग-गीत', 'शराबनो इन्कार', 'आपनी यादी' आदी काव्यांमधून त्याची प्रभुदर्शनपिपासा व्यक्त झाली आहे. उदाहरणार्थ :–

(१) जादुभरी बुलबुल बजावे वांसळी,
तेनी जबामा कोण छे जाणुं नही

(२) देखी बुराई ना डरू हुं,
शी फिकर छे पापनी
धोवा बुराईने बधे गंगा वहे छे आपनी. . . .

त्याचे 'आपनी यादी' हे ह्या प्रकारचे काव्य तर गुजराथी साहित्यात अप्रतिम आणि अमर आहे.

कलापीचे आयुष्य फक्त २६ वर्षांचे होते, त्यात देखील त्याचा साहित्यकाल तर काही वर्षांचाच ठरेल. त्याची कलादृष्टी विकसित व स्थिर व्हायच्या अगोदरच त्याचा अंत झाला, आणि त्याच्यामधील कलाकार असा अविकसित दिसला, तरी त्याचे कवित्व गहन होते ह्याबद्दल शंका नाही. गुजराथी साहित्याच्या श्रेष्ठ कविपंचकांमध्ये त्याचे स्थान आहे. गुजराथी साहित्यात त्याने अनेक गोष्टी नवीन दिल्या आहेत. तत्कालीन गुजराथी काव्याची भाषा जनविमुख झाली होती, तिला अधिक स्वाभाविक तर त्याने केलीच परंतु त्याची प्रौढता व शिष्टतादेखील ह्याबरोबर कायम ठेवली. नवीन विषय, नवीन अनुभव त्याने संस्कृतवृत्तांमधून मांडले तरी त्याच्यावर इंग्रजी काव्यांचादेखील तेवढाच प्रभाव होता. त्याने गुजराथी काव्यात नवीन प्राण आणला. कुसुमसुकुमार भावनांना निखालसतेने अत्यंत ललितमधुर भाषेत व्यक्त करण्याचे श्रेय कलापीला आहे. त्याची शेवटल्या वर्षात लिहिलेली बरीचशी काव्ये त्याच्या उच्च काव्य-प्रतिभेचे दिग्दर्शन करतात. त्याचे अल्पायुष्यत्व म्हणजे गुजराथी काव्याचे दुर्भाग्यच होय. महाकवीचे गुण असलेला हा कवी अल्पायुष्यामुळे तसा होऊ शकला नाही, ही खरे पाहता विधीची मर्यादा आहे, कलापीची नव्हे !

---



अनुक्रमणिका






भाई माधवराव बागल

# गांधीवादाचे उपासक

### गांधीवादाचे खरे उपासक कोण ?

मार्क्सवादाला पोलादी चौकटीत टाकणारे निघाले तसेच गांधीवादालाही पोलादी चौकटीत अडकवून टाकणारे व त्या तत्त्वाची वाढ खुंटवून टाकणारेही निघाले. आम्हीच खरे गांधीवादी म्हणून ते मिरवित आहेत.

अशी पोलादी चौकट निर्माण केली तर त्यात गांधीजींनी आपले मानसपुत्र म्हणून मानलेले पंडित जवाहर नेहरूही बसणार नाहीत.

कारण नेहरूंनी गांधीजींची सर्वच मते काही स्वीकारली नव्हती. त्यांच्या श्रद्धा स्वीकारल्या नव्हत्या. त्यांचा वेश स्वीकारला नव्हता. पक्षशिस्त म्हणून खादीधारी असले तरी देश, काल, हवामान व परिस्थितीप्रमाणे ते त्या पोषाखात बदल करीत होते. त्या त्या देशाच्या रिवाजाप्रमाणे ते पोषाख करीत.

गांधीजींनी कडकडीत थंडीतही दरिद्री नारायणाचा पोषाख बदलला नाही. खाण्यात बदल केला नाही. चरखा चालवण्याचा नियम चुकवला नाही.

नेहरूंनी खादीला विरोध केला नाही पण गिरण्यांना व यांत्रिक सुधारणेला भरपूर प्रोत्साहन दिले.

गांधी ईश्वरवादी होते. आतला आवाज म्हणजे ईश्वराचा आवाज मानीत होते. धर्मश्रद्धेला त्यांच्या जीवनात आचार विचारात स्थान होते.

नेहरू ईश्वरवादी नव्हते. नीती मानत असले तरी गांधीजींच्या प्रमाणे धार्मिक वृत्तीचे नव्हते. तरी अहिंसेला प्राधान्य देणारे होते.

अशी ही भिन्नता असूनही गांधीजी त्यांनाच आपला वारस मानीत. याचाच अर्थ गांधीजींना आपल्या विचारांना पोलादी चौकटीत बसवण्याची इच्छा नव्हती. गांधीजींच्यात परिस्थितीशी जुळवून घेण्याची लवचिकता होती.

युद्ध सुरू झाले ! त्यावेळी तोफेच्या आडवे पडून हिंसा बंद करण्याचा अव्यवहारी आत्मनाशी प्रयत्न गांधीजींनी केला नाही. तर जायबंदी सैनिकांची शुश्रूषा करण्यासाठी स्वतः पुढाकार घेऊन पथक काढले. अन् त्या कामगिरीबद्दल त्याना गोऱ्या लोकांनी सन्मानाचे पदक अर्पण केले.

प्राणांतिक वेदनेने तडफडणाऱ्या वासराचे हाल पहावेनात म्हणून त्यानी त्याच्या यातना चुकवण्या-करता त्याला झटकन् मारून त्याची त्या यातनेतून सुटका करण्यास परवानगी दिली.

प्लेग आला होता, त्यावेळी उंदीर मारावेत की नाही असा प्रश्न उपस्थित झाला. त्यावेळी मानवी जीवाचे रक्षण करण्याकरता प्राणिहत्येला त्यांनी परवानगी दिली.

नाकाला फडके बांधून डोळयाला न दिसणाऱ्या सूक्ष्म जंतूंची हत्या चुकवणाऱ्या यतींची अव्यवहारी अतिरेकी अहिंसा त्यांची नव्हती.

तुमच्या बायकोवर कोणी गुंडाने हल्ला केला तर तो अहिंसेच्या मुखवटयाखाली खपवून घेण्याचा उपदेश त्यांनी केला नाही. प्राण देण्याची हिंमत नसल्यास हिंसा करा, शस्त्र हाती घ्या, असाच उपदेश त्यानी केला आहे.

कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे गांधीजींच्या अहिंसे-बद्दल म्हणतात :

"अहिंसा आणि क्षात्रधर्म हा परस्परापासून अलग करता येत नाही. तोंडाने अहिंसा मंत्र पाठ करणारे गांधीजीही शिवाजीच्या क्षात्रधर्मानेच निघाले आहेत. अहिंसा हा धर्म नसला तरी तेच धोरण राखण्याची खबरदारी इतरानी तरी काय पण अस्सल अधिकारी क्षत्रियांनीही राखणे भाग आहे. "

गांधीजीनी हाच उपदेश अगदी स्पष्ट शब्दात राष्ट्राला दिला आहे. ते म्हणतात :

'Under Swarajya too I would not hesitate to advise those who would bear arms to do so and fight for the country ...... I would rather have



अनुक्रमणिका






India resort to arms in order to defend her honour than that she should in cowardly manner become or remain a helpless witness to her own dishonour '.

' देश रक्षणासाठी भारताने दुर्बलता व अपमान पतकरण्यापेक्षा बेलाशक हाती शस्त्र धरावे. '
श्रेष्ठ विचारवंत आचार्य भागवत म्हणतात :

" महात्मा गांधी जेव्हा हिंसेचा विरोध करतात त्यावेळी मारण्याच्या संकुचित अर्थाने बोलत नाहीत. त्यांच्या अहिंसेमध्ये मानवी समानता पायाभूत असून विषमतेविरुद्ध प्रतिकार हा त्यात अभिप्रेत आहे. "

येथे गांधीजींची विचारसरणी मार्क्सवादाला शोभण्याजोगी आहे. गांधीजी लिहितात,

" प्रत्येकाला त्याच्या गरजेप्रमाणे हाच आर्थिक समतेचा खरा अर्थ आहे. मार्क्सची तीच व्याख्या आहे. बायको व चार मुले असलेल्या माणसाइतकेच आपणास मिळावे अशी एखाद्या सड्या माणसाने मागणी केली तर तो आर्थिक समतेचा भंग आहे. वरचा वर्ग आणि सामान्य जनता, राजा आणि भिकारी यांपैकी पहिल्या वर्गाच्या गरजा अधिक म्हणून त्याना जास्त लागते असे म्हणून या दोन वर्गातील डोळयात भरणाऱ्या भेदाचे समर्थन करण्याचा प्रयत्न कोणी करू नये. श्रीमंत आणि गरीबात असणारा फरक हे दुःखद दृश्य आहे. खेड्यातील गरीब लोक अन्नाची पैदास करतात पण त्यानाच भुकेले रहावे लागते ! ते दूध काढतात पण त्यांच्या मुलांना दूध मिळत नाही ! ही लाजिरवाणी गोष्ट आहे. प्रत्येकाला समतोल आहार, रहायला व्यवस्थित घर, मुलांच्या शिक्षणासाठी सोय व पुरेशी मदत मिळाली पाहिजे. "

रशिया व भारत या दोन्ही देशांतील आर्थिक नियोजनाचे सूत्र याच उद्दिष्टाला धरून नाही का आधारलेले आढळत ? त्या नियोजनात यांत्रिक साधनाना विशेष स्थान दिले म्हणून भारत गांधीवादाला सुटून चालला आहे असे म्हणता येणार नाही.

गांधी तत्त्वज्ञानाचे भाष्यकार आचार्य जावडेकर म्हणतात : ' गांधीवादाचा विरोध यांत्रिक उत्पादनाला नसून औद्योगिक केंद्रिकरण, आर्थिक दास्य, वर्गकलह आणि आर्थिक विषमता यांना आहे ' म्हणून चरखा चालवणारा व खादी वापरणारा हाच खरा गांधीवादी म्हणण्यात कांही अर्थ नाही. निव्वळ भगव्या वस्त्रात शुचिर्भूतता नाही. त्या पेहेरावामागे त्यागाचे, शीलाचे, संन्यासाचे तत्त्वज्ञान आहे.

यंत्राने गरीबाची पिळवणूक होता कामा नये. यंत्राचे माणसांनी गुलाम होता कामा नये हाच खादी व चरख्यामागील हेतू आहे.

यंत्रानी जर गरीबांचे जीवन सुखी केले; यंत्र मालकीमुळे उत्पन्न होणारी विषमता व गुलामगिरी जर टाळता आली, देशसमृद्धी व बुद्धीचा विकास करण्यास अनुकूलता प्राप्त करून दिली तर चरख्यालाच अंधपणाने चिकटून राहणे हा आंधळा गांधीवाद झाला.

चरखा शेतकऱ्याच्या बुद्धिविकासाला जर आड येत असेल, नांगर चालवणारा बैल व चरखा चालविणारा शेतकरी बौद्धिकदृष्ट्या एकाच पातळीवर राहणार असेल, शेतकऱ्याची संस्कृतीशी जर फारकत होणार असेल, कष्टकरी अन् पांढरपेशावर्ग यांच्यातील बौद्धिक विषमता जर वाढत असेल तर चरख्याला चिकटून राहणे म्हणजे अज्ञानाला चिकटून राहणे होय. विज्ञानाला टाकून देणे होय !!

स्वातंत्र्य पूर्वकालातील चरखा व खादीची आवश्यकता स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही तितकीच आहे म्हणणे म्हणजे परिस्थितीचा विचार न करता जुन्याला चिकटून राहणे होय. प्रगतीला खुंटून ठेवणे होय !

त्यावेळी परदेशी कापडामुळे बाहेर जाणारा पैसा कायद्याने बंद करता येत नव्हता. गिरण्यांचे राष्ट्रीकरण करणे हाती सत्ता नसल्यामुळे शक्य नव्हते. म्हणून त्यावेळी परदेशी जाणारा पैशाचा प्रवाह थांबवण्याचा हा एक, व्यक्तिहाती उरलेला मार्ग होता. चरखा हेच एक आपल्या हाती प्रतिकारात्मक अहिंसक शस्त्र होते. आज त्याची तितकी आवश्यकता उरलेली नाही. चरखा हा आज एक अव्यवहारी बुडीतला धंदा आहे. व बहुजनसमाजाचा बौद्धिक विकास थांबवणारा आहे.

जी गोष्ट अहिंसेची तीच खादीची. परिस्थितीचा विचार करूनच तिचा वापर करावयाला हवा. निव्वळ खादी वापरणारा गांधीवादी होऊ शकणार नाही तो सोंगाड्या गांधी–वादी होय !!








परिस्थिती पाहून गांधीजी स्वतः बदलले आहेत यामुळे परस्पराची विरुद्ध अशी मते व्यक्त केल्याचा आरोप त्यांच्यावर लोकांनी केला आहे. त्यावेळी त्यांनी त्याना खालील उत्तर दिले आहे :

"People say that I have changed my views, that I say something different from what I have said years ago. The fact of the matter is that conditions have changed, I am the same my words and deeds are directed by prevailing conditions. There has been a gradual evolution in my invironment and I read to it as a Satyagrahi."

'मी काही वर्षापूर्वी जे बोललो त्याच्या उलट आज बोलतो म्हणून मी माझी मते बदलली आहेत असा लोक मजवर आक्षेप करतात पण खरी गोष्ट म्हणजे परिस्थिती बदलली आहे. पण मी तोच आहे. त्या त्या कालची परिस्थिती पाहून माझी बोली व कृती बदलते. कारण सभोवतालच्या उत्क्रांतीबद्दल माझ्यात बदल होत असतो कारण मी सत्याग्रही आहे.

ज्यावेळी त्यांच्या दोन लिखाणात विरोध दिसून येई तेव्हा ते म्हणत :

'माझ्या शब्दाची किंमत असेल तर पूर्वीचे त्याज्य आणि नंतरचे ग्राह्य समजा. मी सदैव शिकत आहे.'

याचाच अर्थ गांधीजींनी संप्रदाय निर्माण केला नाही. धोरण आणि उद्दिष्ट पुढे ठेवले.

स्वातंत्र्यपूर्व कालातील चरखा व खादीचे महत्त्व स्वातंत्र्यानंतरही तसेच उरले आहे म्हणणे वस्तुस्थितीला सुटून आहे.

शासनसंस्था हिंसात्मक असूनही तिच्याखेरीज आज समाजाचे चालूच शकत नाही आणि भलत्याच वेळी ती मोडल्यास त्यातून अराजकता निर्माण होईल म्हणून त्यानी शासनसंस्थेला मान्यता दिली. व मार्गदर्शन केले.

ती शासनसंस्था गांधीजींच्या धोरणानुसार म्हणजे अहिंसा हे अंतिम ध्येय मानून ते प्रत्यक्षात आणण्याकरता अवश्य तेथे काँग्रेसला हिंसा करावी लागली आहे.

देशाचे संरक्षण करण्याकरता, देशाचा स्वाभिमान राखण्याकरता व निधर्मी लोकशाही जतन करण्याकरता नाइलाज म्हणून गांधीवादी शास्त्रीजींना युद्धाला तोंड द्यावे लागले. पण युद्धाने ईप्सित साध्य झाल्यानंतर धैर्याने व शांतचित्ताने ताश्कंद तहनाम्याला पाठिंबा द्यावा लागला.

अहिंसेची भलतीच ओढाताण केली असती तर देशाला पराभव पतकरावा लागला असता आणि सन्मान्य युद्धतहकुबीला मान्यता दिली नसती तर जगाला युद्धाचा खाईत लोटण्याचे महत्पाप लागले असते !

म्हणूनच शास्त्रीजी व जगाला '**पंचशीला**' देणारे, जगत्शांतीचा मार्ग दाखवणारे पंडितजी, हे गांधीवादाचे खरे उपासक होत.

मार्क्सवादाला विविध फुलांचा बहर आला. परिस्थितीप्रमाणे लेनिन, स्टालीन, क्रुशाव, कोसिजीन यांनी स्वतंत्रबुद्धीने निष्कर्ष काढले. तरी सर्वांचा आधार मार्क्सवादच.

तीच गोष्ट गांधीवादाची ! भारतातले परस्परविरोधी वाटणारे पक्ष आणि व्यक्ति गांधीवादाचा वारसा घेऊनच लोकांपुढे वावरत आहेत.

प्रख्यात तत्त्वज्ञानी सी. ई. एम्. जोड म्हणतो:

"गांधीजींचा सत्याग्रहाचा मार्ग हा भावी पिढयांना थोर असा वारसा आहे. भांडणे मिटवण्याकरता त्यांनी उद्घोषित केलेल्या मार्गामुळे अत्याचाराचा मार्ग बंद पडण्याची नुसती शक्यता आहे एवढेच नव्हे, तर मानवाच्या विनाशसाधनाचा (अॅटम् बॉंब) हिंसेचा मार्ग मागे पडलाच पाहिजे."

अमेरिका, रशिया ही दोन्ही राष्ट्रे मतभेद राखूनही एकमेकाजवळ येत आहेत. शांतता व सहजीवनाचा मार्ग व्यवहारी ठरत आहे. ही दूरदृष्टी महात्मा गांधीजींचीच नव्हे काय ?

रोमा रोला म्हणतो:

'महात्मा गांधीजी म्हणजे धुगधुगणाऱ्या अंगारातील ज्वलंत ज्योत होय ! खवळलेल्या मानवी महासागराला योग्य दिशा दाखवणारा दीपस्तंभ होय'.

त्याच दीपस्तंभावर दृष्टी केंद्रीभूत करून अनेक छोटे मोठे लोक आपला मार्ग आखीत आहेत.

'The ideal for which Gandhi lived and died is the reconciliation of peoples and the building of fraternal world.'

अहिंसा म्हणजे व्यक्तिजीवनाला, समाजजीवनाला, तसे जगाला, स्वास्थ्य, शांती, समृद्धी व समता मिळवून देणारे शास्त्र आहे. मार्क्सवादाहूनही सर्वव्यापी असे हे तत्वज्ञान आहे. यात मानवतेचा खरा विकास आहे.

'भारत ही गांधीजींची कर्मभूमी असली तरी त्यांचे कर्म विश्वासाठी होते. ते विश्वपुरुष होते. ते जगाचा अंतर्नाद होते.' – शंकरराव देव.

नभोमंडळात लहान मोठे तारे येतील जातील, पण सूर्य तो सूर्यच ! नेहरू, शास्त्रीजींप्रमाणे देदीप्यमान तारे चमकले तशा अनेक छोट्या व्यक्तीही चमकत आहेत. गांधीजींच्या धोरणाने व ध्येयाने वाटचाल करणारे ते सर्व गांधीवादाचे उपासकच होत.

गांधीवाद हे गतिमान असे तत्त्वज्ञान आहे.

---





अनुक्रमणिका








## वाचकांचा पत्रव्यवहार–

### वामन दाजी ओक यांचे एक पत्र

(संग्राहक–पां. ना. कुलकर्णी)

माझे एक विद्यार्थीमित्र श्री. गो. मा. देशपांडे यांच्या घरी (कुरुंदवाड, जिल्हा कोल्हापूर) काही जुने कागदपत्र आणि हस्तलिखित ग्रंथ पाहात असताना प्रस्तुतचे पत्र मला उपलब्ध झाले. 'अल्पिष्टन' साहेबाचे चरित्र लिहिणाऱ्या गोडबोल्यांच्या संग्रहातून हे पत्र श्री. देशपांडे यांच्या घरी आले असावे. पत्र दिल्याबद्दल श्री. देशपांडे यांना धन्यवाद.

पुढे कंसात दर्शविलेला मजकूर काकपद काढून ओळीच्या वर लिहिला आहे. पत्र पुढीलप्रमाणे :–

॥ श्री ॥

नागपुर
ता. १५-१-८२.

श्रीमंत राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री बापूसाहेब कुरुंदवाडकर स्वामीचे सेवेशीं

कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विशेष. आपलें पत्र आलें तें पाहून परम संतोष झाला. आपण परवानगी दिली या योगानें आपले मजवर मोठे उपकार झाले असें मी समजतों. त्या उपकाराचा भार उतरून टाकण्याचें सामर्थ्य माझें नाहीं. म्हणून वाईट वाटतें. अस्तु.

स्वर्गवासी गणेश वासुदेव जोशी यांजवरील काव्य मीच लिहिलें ही गोष्ट कळविण्यासारखी नाहीं, तथापि आपल्या सूचनेप्रमाणें कळविली आहे. आपला अभिप्राय प्रस्तुत काव्याविषयीं काय आहे हें सवडी-प्रमाणें कळविल्यास मोठी मेहरबानगी होईल.

गणेशपुराण आर्यांतील दोन वेंचे घेतले आहेत. (१) राजाचा पुत्रास उपदेश व (२) बायकोचा पतीस उपदेश. माझ्या भावी पुस्तकांत घालण्यासाठीं गणेशपुराणाच्या उत्तरभागांतील वेंचे आनन्दानें घेईन, परंतु आपला ग्रंथ तपासून तयार झाला नाहीं, म्हणून आतांच तसदी देणें (मला उचित) नाहीं. तथापि पूर्वोक्त उपदेशांप्रमाणें बोधपर वेंचा २०।२५ आर्यायुक्त असल्यास अथवा (त्याहून) लहान असल्यास तेवढाच (सोय असेल तर) पाठवावा.

आपण म्याकबेथचें पद्यात्मक भाषांतर केलें आहे असें रा. रा. बाळाजी प्रभाकर मोडक यांचे इतिहासा-वरून समजतें. प्रस्तुत भाषांतराची प्रत मजकडे पाठविल्यास, त्यांतील कांहीं उतारे संग्रहार्थ घेतां येतील अशी खात्री आहे, तेव्हा माझी विनंति मान्य करून भाषांतर पाठवून देण्याची मेहरबानी व्हावी असें नम्रतापूर्वक सूचवितों. आपल्या पत्रांतील माझ्या भावी पुस्तकाविषयीं अनुमान खरें होवो असें इच्छितों. गणेशपुराणाच्या उत्तर भागांतील उतारे घेण्याविषयीं आपण इच्छा दर्शविली म्हणून म्याकबेथ् नाटकाचे भाषांतराविषयीं विनंति करण्याचें धैर्य केलें आहे त्याची माफी असावी. कळावें कृपालोभ करावा हे विनंति.

आपला प्रेमेच्छु
वामन दाजी ओक.

ता. काम झाल्यावर आपली प्रत नीट व्यवस्थेनें परत पाठवूं. कळावें कृपालोभ करावा हे विनंति.

०००

श्री. संपादक 'नवभारत' यास,

स. न. वि. वि.

नवभारताच्या मार्च १९६६ च्या अंकात डॉ. वऱ्हाडपांडे यांचा 'वेदांचा काल : दीक्षितांचा अचल सिद्धांत' हा लेख कै. शं. बा. दीक्षितांच्या एका ज्योतिषविषयक प्रमाणाचे समर्थन करण्यासाठी व त्यावर काही भूतपूर्व संशोधकांच्या आक्षेपांचे निराकरण करण्याच्या हेतूने लिहिलेला दिसतो. तो लेखही ज्योतिषाच्या भूमिकेवरून वेदकालाच्या बाबतीत दीक्षितांच्या नंतर पुढे आलेल्या ठळक प्रमाणांची दखल घेत नाही. ही मर्यादा पडण्याचे कारण लेखकच अधिक स्पष्ट करू शकेल. दीक्षितांच्या भारतीय ज्योतिषेतिहासाला एक फार मोठी मर्यादा पडलेली आहे आणि ती म्हणजे जैन ज्योतिषाचा ते उपयोग करू शकले नाहीत. वेदांग ज्योतिषाचा अधिक किंबहुना संपूर्ण अर्थ स्पष्ट करण्याचे कार्य कै. डॉ. श्यामशास्त्री यांनी जैन ज्योतिषाच्या साहाय्याने केले आहे.







कै. व्यंकटेश बापूजी केतकर यांनी बृहस्पती आणि पुष्य नक्षत्र यांची भेदयुती सुचविणारे जे वैदिक वचन संशोधकांच्या निदर्शनास आणले ते प्रमाण या कृत्तिका-मूलक प्रमाणापेक्षाही ग्राह्याग्राह्य ठरविण्याचा प्रपंच जर डॉ. वऱ्हाडपांडे यांनी केला असता तर ज्योतिष-मूलक वैदिक महत्त्वाची भर पडली असती.

तसेच, कात्यायनाच्या शुल्वसूत्रात प्राची साधण्यासाठी उपयोगात आणावयाच्या ताऱ्यात बौधायनानी दिलेल्या ताऱ्यांपेक्षा एक अधिक आणि तो म्हणजे पुष्य हा दिलेला आहे. त्याचाही उपयोग करून काळ काढण्याचा प्रयत्न मराठी आणि इंग्रजी दोन्ही भाषांत उपलब्ध आहे. याकडेही आपली चिकित्सक दृष्टी वळविण्याची डॉ. वऱ्हाडपांडे यांना आग्रहाची विनंती आहे. पुष्याच्या निःसंदिग्ध प्राची साधण्याच्या उपयोगामुळे वैदिक वाङ्मय आणि विधी यांचा काळ कृत्तिकांच्या मागे चार हजारांपेक्षा अधिक जातो. तसेच मराठी आणि हिंदी मध्ये या दिशेने लिखाण बरेच आणि विविध प्रकारचे झाले आहे. त्यातील ठळक प्रयत्नांचा परामर्श डॉ. नी. र. वऱ्हाडपांडे या सारख्या विद्वानांनी चिकित्सापूर्वक घेतल्यास वैदिक वाङ्मयाच्या ज्योतिषविषयक अभ्यासात निश्चित महत्त्वाची भर पडेल. एकच आणखी उदाहरण म्हणून संशोधकांच्या नजरेस आणण्यासारखे ज्योतिषविषयक गमक म्हणजे मार्गशीर्ष महिन्याला गंगायमुनेच्या परिसरात अगहन=अग्रहायण म्हणतात. लोकमान्यांचे संपूर्ण 'ओरायन' वाचल्यावर जर ही बाब त्यांना माहीत असती तर त्या ग्रंथात तिचा कसा उपयोग झाला असता किंवा त्यांच्या प्रतिपादनाला कुठे कुठे त्यामुळे मुरड घालावी लागली असती हासुद्धा आज महत्त्वाचा विषय आहे असे सुचवितो. व त्यावर चर्चा अपेक्षितो.

—भा. रं. कुळकर्णी.










# सारसंकलन

## जन्माला आलेले प्रत्येक बालक हवेसेच असावे

संततिप्रतिबंधनाच्या चळवळीच्या एकविसाव्या वाढदिवशी पर्ल बक या सुप्रसिद्ध लेखिकेनें म्हटले आहे की, " संतति प्रतिबंधनाच्या चळवळीला जेवढे अडाणी व अंध सामाजिक गैरसमजुतीस तोंड द्यावे लागले व विरोध सहन करावा लागला तसा विरोध राजाच्या दैवी हक्काविरुद्ध झगडणाऱ्या किंवा सार्वत्रिक मतदानासाठी भांडणाऱ्या किंवा कोणत्याही स्वातंत्र्याच्या चळवळीला करावा लागला नाही."

संततिनियमनाची साधने वापरून कुटुंबनियोजन करण्याची चळवळ हाती धरण्याचे कठीण व्रत मार्गारिट सँगर यांनी ५० वर्षांपूर्वी घेतले व सर्वांचा रोष पत्करला. " जन्माला न आलेल्या मुलांची खुनी राक्षसीण " म्हणून अनेक व्यासपीठावरून तिला संबोधण्यात आले. मार्गारिट सँगर यांनी पहिल्याने उपयोगात आणलेला 'संतति नियमन' हा वाक्प्रचार अनैतिक व बेकायदेशीर म्हणून वापरण्यास अयोग्य ठरविण्यात आला होता. अमेरिकन मध्यवर्ती सरकारने संततिनियमनासंबंधी कोठलीही माहिती टपालाने पाठविणे बेकायदेशीर ठरविले होते. मार्गारिट सँगरला आठ वेळा पकडण्यात आले. संततिनियमनाच्या चळवळीमुळे तिचे पहिले लग्न मोडले. परंतु गेल्या आठवड्यात टसकन येथे ब्याऐंशीव्या वर्षी तिला जेव्हा मृत्यू आला त्यावेळी तिचे स्वप्न साकार झाले होते. संततिनियमनाचा हक्क प्रत्येक स्त्रीला मिळालेला तिला पहाता आला. आपल्या कुटुंबाचा आकार ठरविण्याचा हक्क अमेरिकेत मान्य झाला असून जगात सर्वत्र झपाट्याने तो मान्य केला जात आहे.

मार्गारिट सँगर या हाडापेराने लहानशा असून दिसायला नाजूक होत्या. एखाद्या धिप्पाड पुरुषी बाईने अमेरिकन सरकारशी सामना दिला असता तर नवल वाटले नसते. परंतु पाच फूट उंचीच्या व लाल केसांच्या, या हसतमुख, चुणचुणीत व दमदार स्त्रीने आपल्या ध्येयाकरिता दिलेला लढा आश्चर्यकारक आहे.

**छपरावर झोपावे**

न्युयार्क संस्थानातील कॉर्निंग येथे मार्गारिट सँगर यांचे बालपण गेले. ती एकंदर अकरा भावंडे असून मार्गारिटचा नंबर सहावा होता. आई वयाच्या ४८ व्या वर्षीच क्षयाने वारली. १७ व्या वर्षी मार्गारिटने विल्यम सँगर यांचेशी लग्न केले. व समाजवादी पक्षात पण सामील झाली. नर्सिंगचे शिक्षण घेऊन आपल्या गावातील गलिच्छ वस्त्यातून ती लोकांची सेवा करू लागली.

१२ जुलै, १९१२ हा दिवस मार्गारिटच्या आयुष्यातील क्रांतिकारक दिवस ठरला. सँडी साँस या २८ वर्षे वयाच्या बाईला मदत करण्याचे मार्गारिटला बोलावणे आले. ही बाई एका ट्रक ड्रायव्हरची बायको असून आपल्या तीन मुलांसह एका लहानशा खोलीत रहात असे. त्या दिवशी तिने स्वतःचा गर्भपात करण्याचा प्रयत्न करून आपला जीव धोक्यात आणला होता. आणखी एक मूल झाल्यास मी खलास होईन तरी मला काहीतरी उपाय सुचवा अशी प्रार्थना या बाईने डॉक्टर व नर्स या दोघांचीही केली. 'तुझ्या नवऱ्याला घराच्या छपरावर झोपायला लाव' असा सल्ला डॉक्टरने दिला व तो निघून गेला. तीन महिन्यानंतर पुन्हा स्वतःचा गर्भपात करण्याच्या प्रयत्नात सँडीचे जीवन संपले. मार्गारिट सँगर खडबडून जागी झाली, तिचे ध्येय ठरून गेले.

१९१३ साली फ्रान्स व स्कॉटलंड येथील संततिनियमन केन्द्रातून अनेक प्रकारची माहिती गोळा करून ती अमेरिकेत प्रसिद्ध करण्याकरता मार्गारिट सँगर परत आली. तिने 'बंडखोर स्त्री.' नावाचे एक मासिक प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली .या मासिकाचे ब्रीदवाक्य 'देव नाहीत व मालकही नाहीत' ( No Gods, No Masters ) असे होते. पहिल्याच संपादकीय अग्रलेखात संततिनियमनासंबंधी माहिती पुढील अंकात दिली जाईल. असे आश्वासन देण्यात








आले. या अंकाच्या बहुतेक प्रती टपालातच जप्त करण्यात येऊन मार्गारेट सँगरवर नऊ आरोप ठेवून खटला का भरू नये अशी विचारणा करण्यात आली. आपल्या बचावाची तयारी करण्यास अवधी मिळावा म्हणून ही अबला आपल्या तिन्ही मुलांना एका नर्सच्या स्वाधीन करून कोर्टाच्या परवानगीशिवाय व पासपोर्ट न घेता बार्था वॅटसन हे नाव धारण करून कॅनडात पळाली. तेथून लवकरच ती युरोपला पळाली.

### तू स्त्री नव्हेच

एक वर्षानंतर ती अमेरिकेत परत आली तेव्हा तिच्यावरील खटला सुरू झाला. परंतु मध्यंतरीच्या काळात समाजात तिला पाठिंबा मिळू लागला. तिचा बचाव साधा होता. 'बंडखोर स्त्री' ने बेकायदेशीर गोष्टी प्रसिद्ध करण्याचे आश्वासन दिले होते. त्या प्रसिद्ध केल्या नव्हत्या. सरकारला खटला काढून टाकावा लागला.

१९१६ साली ब्रुकलिन येथे पहिले संतति-नियमन केन्द्र सुरू केले. पहिल्याच दिवशी १५० स्त्रिया आपल्या तान्हुल्यांच्या बाबागाड्या ढकलीत १० सेंट ही रजिस्ट्रेशन फी भरण्याकरता केन्द्राच्या दारात दाखल झाल्या. ९ दिवसांनी या केन्द्रावर पोलिसांनी छापा घालून ते बंद पाडले. हा छापा घालणाऱ्या पोलिस तुकडीत काही स्त्री पोलिस होत्या. ज्या स्त्री पोलिसांने .मार्गारेटला पकडले तिच्या अंगावर ती ओरडली, 'तू आपल्या जातीशी बेइमान होत आहेस. तू स्त्री नव्हेसच". मार्गारेट सँगर एक मैलावर असलेल्या तुरुंगापर्यंत चालत गेली. तिला ३० दिवसांची सजा देण्यात आली.

### हसण्यासारखे जगात काहीच नाही

यानंतर अनेक मित्रमैत्रिणींनी चळवळ सोडून देण्याचा सल्ला मार्गारेटला दिला. परंतु जगात ज्या स्त्रियांना हसण्यासारखे काहीच नाही अशा स्त्रियांची मी पाठीराखी आहे; त्यांचेच नेतृत्व मी पत्करले आहे असे तिने स्पष्ट सांगितले. याच काळात तिची हॅवलॉक एलिसशी भेट झाली. व ती त्याच्या प्रेमात पडली, परंतु त्याचे पूर्वीच लग्न झालेले असल्यामुळे त्यातून काही निष्पन्न झाले नाही. १९२२ साली आपले स्वतंत्र अस्तित्व कायम राहील, आपले नावसुद्धा मार्गारेट सँगरच राहील या अटी मान्य करणाऱ्या नोही स्ली या धनाढ्य गृहस्थाशी तिने लग्न केले. हे दोघे वेगवेगळ्या घरातून रहात असून एकमेकास भेटण्याच्या वेळा व ठिकाणे टेलिफोनने निश्चित करीत असत. एकत्र जेवण करावयाचे असल्याससुद्धा पूर्वी ठरवावे लागत असे. लौकिकदृष्ट्या हे लग्न विचित्र होते. परंतु दोघांचे प्रेम टिकावू होते म्हणून ते शेवटपर्यंत टिकले.

१९२० ते ३० च्या काळात संतति नियमनाची साधने अमेरिकेत बेकायदा होती तरीसुद्धा त्यांचा प्रचार पुष्कळच झाला. उघडपणे ती वापरल्याचे मात्र कोणी कबूल करीत नसे. त्यांची नावेही चमत्कारिकच पडली होती. उदाहरणार्थ, डायाफ्रॅमला 'डपिटि कपिटी' म्हणत असत. या सर्व काळात मार्गारेट सँगरचा लढा चालूच होता. फेडरल सरकारने संतति-नियमनाच्या प्रचारावरील बंदी काढण्याकरता तिचे अव्याहत प्रयत्न चालू होते. डॉ. हॅनथ स्टोन या आपल्या ओळखीच्या डॉक्टरकरता मार्गारेट सँगरने जपानहून एक नव्या धर्तीची पेसरी मागविली व ती अमेरिकन कस्टम अधिकाऱ्याच्या हातात पडली. 'अमेरिकन सरकार विरुद्ध एक पार्सल' ही केस त्यावेळी बरीच गाजली. परंतु त्यावेळच्या जिल्हा न्यायाधीशाने सरकारच्या विरुद्ध निकाल देऊन ते पार्सल मालकाला द्यावे असा निर्णय दिला. १९३७ साली अमेरिकन अॅटॉर्नी जनरलने ही केस सुप्रीम कोर्टात नेण्याविरुद्ध निर्णय घेऊन टपालातून प्रचार करण्याचा मार्ग मोकळा केला. परंतु अमेरिकेतील अनेक राज्यातून संतति-नियमन केन्द्रे बेकायदा ठरली गेली होती. गेल्या वर्षीच शेवटच्या राज्यातून ही बंदी उठविण्यात आली.

मार्गारेट सँगरचा प्रचार वैयक्तिक पातळीवरच सुरू होता. 'सध्याच्या जगाच्या पुरुषी संस्कृतीत स्त्री म्हणजे एक मुले जन्मास घालणारा प्राणी आहे' असे ती म्हणत असे. मार्गारेट सँगरने सुरू केलेली चळवळ आज जगाला आशेचा नवा किरण दाखवीत आहे. भरमसाट वाढणाऱ्या लोकसंख्येस आळा घालण्यासाठी सर्वांना कुटुंब नियोजनाच्या चळवळीस शरण जावे लागत आहे. मार्गारेट सँगरच्या दूरदृष्टी-










अनुक्रमणिका

मुळे आज वैयक्तिक सुख जगाचे सुख ठरत आहे. भारत, आफ्रिका वा अमेरिका येथील स्त्रिया संततिनियमनाची साधने वापरून स्वतःचा वैयक्तिक विकास साधत आहेत व त्या बरोबरच अत्यन्त कुटिल असा जागतिक प्रश्न सोडविण्यास मदत करीत आहेत. मार्गारेट सँगरने प्रत्येक मूल हवे असल्यासच जन्माला येऊ द्यावे हे जगाला शिकवले.

—दि टाइम, १६ सप्टेंबर १९६६.

## माओ म्हणजे दुसरा अंकल जो नव्हे

"आमचा एकमेव नेता, आमचा सर्वोच्च सेनापती, सर्वोत्तम शिक्षक, अचूक नावाडी, आमच्या हृदयात तळपणारा सूर्य म्हणजेच माओ" अशा घोषणांनी सध्या चीन दुमदुमत आहे. या सर्व घोषणांना स्टालीनवादाचा घमघमाट येत आहे असे म्हणणे वावगे होणार नाही. सध्या चालू असलेल्या सांस्कृतिक क्रांतिमध्ये भांडवलशाही हस्तकांवर केले जात असलेले आरोप पाहिले म्हणजे आंद्री झेडेनॉव्ह हा उदारमतवादी वाटू लागतो. परंतु माओवाद म्हणजे स्टालीनवादाचीच आवृत्ती आहे असे म्हणणे बरोबर होणार नाही. सध्या चीनमध्ये चालू असलेल्या गोंधळाचा अर्थ लावू लागल्यास बाहेरच्या जगास बऱ्याच गोष्टी शिकता येतील.

माओवाद व स्टालीनवाद यांचेतील साम्य सहज लक्षात येण्यासारखे आहे. दोघांचे मूळ एकच आहे. औद्योगिक क्रांतीच्या पार्श्वभूमीवर सुधारलेल्या आधुनिक युरोपकरता प्रणीत केलेल्या मार्क्सवादाच्या मागासलेल्या पौर्वात्य देशात रुजलेल्या या दोन फांद्या आहेत. स्टालिनिझमचा जन्म जॉर्जिअन हुकूमशहाच्या लहरीतून झाला नसून ज्या देशातील बहुसंख्य जनता गरीब शेतकरी होते त्या देशाचे झटपट औद्योगीकरण करून तेथे प्राथमिक स्वरूपाचा का होईना पण समाजवाद स्थापन करण्याचा तो प्रयत्न होता. माओइझम तर अगदीच मागसलेल्या देशात जन्मला आहे व त्यामुळे समाजवाद स्थापनाचा तेथील कार्यक्रम जास्तच कष्टाचा झालेला आहे. परंतु दोन्ही राष्ट्रांची मागसलेपणास व एकाकीपणास होणारी प्रतिक्रिया मात्र भिन्न स्वरूपाची आहे.

स्टालीन पक्षाचा नेता म्हणून सत्ताधीश झाला. पक्षयंत्रणा त्याकरता वापरण्यात त्याचा हातखंडा होता. त्याने निरनिराळ्या पातळीवर विभागलेला समाज निर्माण करून हुकूम देण्याची वरपासून खालपर्यंतची साखळी निर्माण केली. पहिली आज्ञा सर्वोच्च ठिकाणाहून सुटणार व ती खालपर्यंत पोचवली जाणार यांची त्याने तरतूद केली. जनताजनार्दनाच्या हातात पक्षसफाईचे काम देण्याइतका त्याचा जनतेवर विश्वास नव्हता. पण माओचे तंत्र वेगळेच आहे. त्याचे डोळे भविष्याकडे लागले आहेत. त्याने तरुण पिढीला मनसोक्त वागण्यास सध्या मुभा दिली वती चीनमधील नेतृत्वाचे हक्क सांभाळण्याकरता टिकविण्याकरता नसून त्याला शह देण्याकरता आहे असे वाटते.

चीनमधील सध्याची चळवळ क्रांतीनंतर रशियात झालेल्या रेड गार्डस्‌च्या चळवळीसारखी आहे. यादवी युद्धाने हैराण झालेल्या अर्धपोटी रशियात बंदुकीच्या गोळीच्या साहाय्याने लवकरात लवकर कम्युनिझम प्रस्थापित करण्याचा तो प्रयत्न होता. चीन मध्य चालू असलेल्या सांस्कृतिक क्रांतीचे नेतृत्व विद्यार्थी वर्गाकडे असून त्यांना राष्ट्रीय भांडवलशाही नष्ट करावयाची असून व्याज घेण्याची पद्धती त्यांना नष्ट करावयाची आहे. समाजात असलेले उच्चनीचतेचे सर्व भेदभाव नष्ट करून समान पातळीवरील समाज निर्माण करण्याचे त्यांचे ध्येय आहे.

चीनी रेडगार्डस् व लष्कर यांचे संबंध काहीसा गोंधळ निर्माण करतात. परंतु या दोहोतील संबंध एका दृष्टीने स्पष्ट आहेत. दोन्हींचे नेतृत्व मार्शल लिन पिआओकडे आहे. व लष्कराच्या नेतृत्वाखालीच रेडगार्डस्‌ने रहावे अशा सूचना दिल्या गेल्याचे पण सर्वश्रुत आहे. परंतु माओचे लष्कर व स्टालीनची दुसऱ्या महायुद्धात लढलेली लालसेना यात जमीन-अस्मानाचा फरक आहे. महायुद्धाचे वेळीच खरेखुरे रशियन लष्कर तयार झाले. त्यांच्यात कुटझाव्ह व सुव्हराव्ह या मार्क्सवादपूर्व रशियन वीरांनी नवचैतन्य निर्माण केले. ते राष्ट्रवादी देशभक्त बनले. चीनी लष्कर १९१८ सालच्या रशियन लष्करासारखे आहे. लष्करी गणवेशातील ते कट्टर व शिस्तबद्ध



अनुक्रमणिका






कम्युनिस्ट सभासद आहेत परंतु लष्करातील शिपाई मात्र ते अजून झालेले नाहीत.

दोन्ही राष्ट्रात असलेले फरक राष्ट्रीय, आंतर-राष्ट्रीय व एकाकीपणा यातील गुंतागुंतीच्या संबंधात पण दिसून येतात. जगाला आव्हान देण्यात चीनचा राष्ट्रीय अभिमान दिसून येतो. जागतिक क्रांतीची पेकिंग हीच राजधानी आहे याचा त्यांना अभिमान असल्याचे स्पष्ट दिसत आहे. पाश्चिमात्य व रशियन पत्रकारांना सध्याची चीनमधील चळवळ ही परकीय विरोधी चळवळ वाटत आहे. परंतु प्रत्यक्षात परकीय हे साम्राज्यवादी किंवा प्रतिक्रांतीचे प्रतिनिधी आहेत या समजुतीने त्यांचा छळ होत आहे. आणीबाणीच्या परिस्थितीत स्टालीनने राष्ट्रप्रेमाला व राष्ट्रीय बाण्याला आव्हान दिले तर चीनी नेते भूतकाळाशी असलेले सर्व संबंध तोडण्यास उत्सुक असलेले दिसत आहेत.

दुसऱ्या महायुद्धापूर्वी रशिया जेवढा एकाकी पडला होता तीच परिस्थिती आज चीनची आहे. परंतु स्टालीन एकाच देशात समाजवाद प्रस्थापित करण्याकरताच झटत असल्यामुळे एकाकीपणाचे त्याला काहीच वाटले नाही. इतर देशातील कम्युनिस्ट पक्ष त्याने आपली हत्यारे म्हणून वापरली. समाजवादी पितृभूमी ' धोक्यात येईल वा तिला त्रास सोसावा लागेल असे कोणतेही कृत्य बाहेरच्या कम्युनिस्ट पक्षांना त्याने करू दिले नाही. त्या उलट माओ हा जागितक क्रांतीचा प्रणेता आहे. तो व्हिएटनामी किंवा क्युबान जनतेला चीनच्या हिताकरता स्वस्थ बसण्याचा आदेश देत नाही. उलट सध्याच्या रशियन नेत्याविरुद्ध माओची तक्रारच आहे. आज स्टालीन जिवंत असता तर त्याला आपले चित्र पेकिंगच्या रस्त्यातून मोठ्या मिरवणुकीने फिरताना दिसले असते, त्याच्या वारसांना प्रतिक्रांतिकारक म्हटलेले ऐकावे लागले असते व आपला प्रतिस्पर्धी ट्रॉट्स्की याच्या मुखात शोभणाऱ्या घोषणांनी पेकिंगचे रस्ते दणाणलेले ऐकू आले असते.

चीनी क्रांतीची सध्याची परिस्थिती लढाईतील कम्युनिझम (War Communism) म्हणून वर्णन केली जाण्याची शक्यता आहे. अशा परिस्थितीतही राष्ट्रीय उपयोग करून न घेण्याचा माओचा निर्धार विलक्षण आहे. चीन सध्या युद्धाची तयारी करीत आहे हे त्यांचे एक कारण असेल. कारण व्हिएटनाम मधील युद्धाची परिणती चीन-अमेरिकन युद्धात होणार असे माओला वाटत आहे. या युद्धात रशियाचे धोरण तटस्थतेचे राहील अशी त्याची अपेक्षा आहे. त्यामुळे जर सार्वत्रिक बॉम्बवर्षाव सुरू झाला तर केन्द्राला सर्व चीन सांभाळणे व सर्व राष्ट्राला मार्गदर्शन करणे जड जाईल. अशा परिस्थितीमुळे पक्षसंघटणा किंवा राष्ट्राभिमान यांचा टिकाव लागणे कठीण जाईल. फक्त क्रांतिकारक विचारसरणीच आपल्याला हात देईल म्हणून जास्तितजास्त लोकात क्रांतीचा प्रचार करण्याचे माओने रेडगार्ड्स्ना आव्हान केलेले आहे.

दोन्ही हुकूमशहांच्या काम करण्याच्या पद्धतीतही पुष्कळ तफावत आहे. स्टालीनने आपले प्रतिस्पर्धी पहिल्याने नेस्तनाबूत केले व त्यानंतर गुप्त पोलिसांच्या साहाय्याने पक्षसफाई केली. माओलाही आपल्या प्रतिस्पर्ध्यांना तोंड द्यावे लागत आहे. पक्षांतर्गत सत्तास्पर्धा चीनमध्येही चालू आहे. परंतु गुप्त पोलिसांचे ऐवजी माओने रेडगार्ड्स्ना पाचारण केले आहे. सुरवातीला त्यांनी आपल्या हस्तकांकडे हे काम सोपवले होते. परंतु त्याची निष्पत्ती माओला पसंत पडली नाही. म्हणून पक्ष सफाईचा कार्यक्रम त्याने खालच्या पातळीवरून सुरू करून तरुण पिढीकडे त्याचे नेतृत्व दिले. अशा तऱ्हेच्या कार्यक्रमात, चळवळ हाताबाहेर जाण्याची शक्यता असते. चीनमध्ये रेड-गार्ड्स् व पक्षनेते यांच्यात उडालेल्या चकमकींचा अर्थ पण तोच असण्याचा संभव आहे.

परंतु चीनी क्रांतीमध्ये कोण, कुणाच्या व का विरुद्ध आहे हे समजणे कठीण झाले आहे. म्हणूनही रशियाची चीनशी तुलना करणे कठीण जात आहे. ग्रामीण भागातून शहरांना अन्नाचा पुरवठा होईना म्हणून स्टालीनला सामुदायिक शेतीचा मार्ग पत्करावा लागला. ट्रॉट्स्कीला झटपट औद्योगीकरण पाहिजे होते तर बुखारीनला ते मुंगीच्या पावलानी पाहिजे होते. पण चीनमध्ये सध्या चालू असलेल्या 'राक्षस व ब्रह्मराक्षसाविरुद्ध' लढा प्रत्यक्षात कोणाविरुद्ध







आहे ते समजत नाही. ८ ऑगस्टच्या पत्रकानुसार 'डाव्यावर विश्वास टाका, मध्यभागी असलेल्यांना आपलेसे करण्याचा प्रयत्न करा व उजव्यांशी लढा' असा आदेश दिला आहे. पण यात उजवे कोठले डावे कोठले वगैरे काहीही समजत नाही त्यांचे वर्णनही कोठे सापडत नाही.

चीनमधील राष्ट्रीय भांडवलदार, कम्युनिस्ट अर्थव्यवस्थेच्या मार्गात खरोखरच अडचणी निर्माण करीत आहेत काय ? पूर्वी सधन असलेले शेतकरी आजही कम्युनिझममध्ये मातव्वर आहेत का ? पक्षान्तर्गत नेतृत्त्वासाठी चाललेल्या सत्तास्पर्धेला झाकणारी ही धुळवड तर नाही ना ? औद्योगीकरणाची गती, भांडवल जमा करण्याची पद्धती, निरनिराळ्या योजनावर किती पैसा खर्च करावा, व्हिएटनामबद्दल काय धोरण ठेवावे अशासारख्या अनेक प्रश्नावर नेतृत्त्वामध्ये वाद होणे शक्य आहे. हा वाद हमरीतुमरीवर आला नाही ना ? या सर्वांची उत्तरे एकदम मिळणे कठीण आहे. कारण सांस्कृतिक क्रांती बराच काळ टिकणारी असून तिचा मार्गही सरळ नाही असे चिनी पुढारी म्हणत आहेत. परंतु कालान्तराने का होईना सत्य प्रकाशात आल्याखेरीज रहाणार नाही.

चीनची आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीत नाचक्की झाल्यामुळे रशियाला व्हिएटनामच्या प्रश्नावर पाहिजे तसे निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य मिळेल असे म्हणणे बरोबर होणार नाही. पाश्चात्य किंवा रशियन डोळ्यांना चीनमधील सांस्कृतिक क्रांती विक्षिप्त वाटली तरी प्रत्यक्षात तशी ती असेलच असे नाही. 'लाल दिवा म्हणजे जाण्यास परवानगी' अशा तऱ्हेची विक्षिप्त मागणी किंवा रस्त्यांची नावे बदलणे वगैरे प्रकार चमत्कारिक वाटले तरी भूतकाळाशी संबंध तोडण्याचा तो प्रयत्न आहे हे विसरून चालणार नाही. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळी असे अनेक प्रकार फ्रान्समध्ये घडले याची सर्वांनी जरूर आठवण ठेवावी. जुनी समाजरचना बदलून त्याऐवजी समतेवर उभारलेली नवी समाजरचना निर्माण करावी या ध्येयाचे सर्वत्र असलेले आकर्षण रशियन्सना माहीत नाही असे नाही.

स्टालीनवादाचा वास असलेले माओचे धोरण पश्चिम वा पूर्व युरोपला समजेल असे वाटत नाही. रशियन कम्युनिस्ट राजवटीचे स्फुटनिक हे एक आकर्षण आहे. त्याचाच अर्थ तंत्रयुगात कम्युनिस्ट राष्ट्र पुष्कळ आघाडीवर आहे. परंतु रशिया चीनच्या मानाने समृद्ध असला तरी अमेरिकेच्या मानाने दरिद्रीच आहे. सध्याच्या चीनी सांस्कृतिक क्रांतीने रशियाला अवसर मिळाला आहे कारण रेड गार्डस्नी आपल्या उत्साहाच्या भरात शेक्सपिअर व डोस्टोव्हॅस्की या दोघांच्याही ग्रंथांची होळी केली आहे. त्याबद्दल सर्वत्र शिसारी येणे साहजिकच आहे. परंतु जागतिक क्रांतीचे नेतृत्व पेकिंगकडे जाऊ देण्याइतका गाफीलपणा रशियाला परवडणार नाही. १९१८ साली स्टालीननेच 'Ex Oriente lux' लिहिले. ब्रेझनॉव्ह व कोसिगीन यांना त्याचेच भूत तर सतावत नसेल ना ?

—दि इकॉनॉमिस्ट, लंडन, १७ सप्टेंबर १९६६.

## राष्ट्रकुल—काहीतरी जळत आहे

गेल्या आठवड्यात लंडनच्या प्रचंड आगीला तीनशे वर्षे झाली, त्या निमित्त टेम्स नदीवर प्रचंड फटाक्याचे रॉकेटस् उडवण्यात आले. पण त्याचवेळी टेम्सच्या तीरावरील मार्लबरो हाऊसमध्ये नुसते लंडनच काय पण सर्वच्या सर्व राष्ट्रकुलच जळून खाक होते काय अशी भीती वाटू लागली होती.

१६ वी राष्ट्रकुल पंतप्रधान परिषद सुरू झाली होती आणि स्फोटक व मुख्य प्रश्न होता ऱ्होडेशिया. गेल्या जानेवारीत राष्ट्रकुलातील नऊ आफ्रिकन राष्ट्रांना आर्थिक नाकेबंदी, इआन स्मिथच्या सरकारला ताळ्यावर आणू शकेल असा दिलासा ब्रिटनच्या पंतप्रधान विल्सन यांनी दिला होता. परंतु या नाकेबंदीचा काहीही परिणाम झाला नाही. यंदाच्या राष्ट्रकुल परिषदेमध्ये ऱ्होडेशियाचा प्रश्न प्रामुख्याने पुन्हा पुढे आला व पंतप्रधान विल्सन यांना नव्या बंडास तोंड द्यावे लागले.

**खोटी आशा**

झांबिया व ऱ्होडेशिया हे दोन देश आर्थिकदृष्टया एकमेकांवर अवलंबून असल्यामुळे झांबिया राष्ट्रकुलातून बाहेर पडण्याची भाषा बोलू लागला आहे.










पाच आफ्रिकी राष्ट्रांच्या नेत्यांनी या नाही त्या कारणाकरता परिषदेस येण्याचे टाळले. टांझानियाच्या न्येरेरेने आपल्याऐवजी प्रतिनिधी मंडळ पाठवण्याचेसुद्धा नाकारले. सारा लिओनेचा आलवर्ट यार्गी निव्वळ विल्सनवर हल्ला चढवण्याकरताच परिषदेला उपस्थित राहिला. आपल्या दोन तासांच्या भाषणात त्याने विल्सनला आफ्रिकाविरोधी व दुटप्पी धोरण ठेवणारा मुत्सद्दी म्हणून शिव्या दिल्या.

आफ्रिकी नेत्यांचा सभात्याग विल्सन टाळू शकला कारण त्या कृत्याने आफ्रिकी राष्ट्रांचा काहीच फायदा झाला नसता, उलट आर्थिकदृष्टया त्यांचे नुकसनाच झाले असते. ऱ्होडेशियाबद्दल आर्थिक टाळेबंदीखेरीज दुसरे कोणतेही नवे धोरण विल्सनने सुचवले नाही. परंतु आर्थिक टाळेबंदी करून दहा महिने होऊन गेले तरी स्मिथ सरकार ताळचावर येण्याची चिन्हे दिसत नाहीत. ऱ्होडेशियातील वातावरण स्थिरस्थावर असून सॅलिस्बरीच्या रस्त्यातून पूर्वीइतक्याच गाड्या धावत आहेत. दक्षिण आफ्रिका व मोझांबिकच्या सरहद्दीवरून पुष्कळ पेट्रोल ऱ्होडेशियात आणले जाते. सर्व कारखाने जवळजवळ पूर्णपणे चालले असून गोऱ्या लोकात थोडीही बेकारी नाही. पाहिजे असलेला सर्व माल दक्षिण आफ्रिकेच्या मार्गे आयात करता येतो. गोल्फ बॉलसारख्या वस्तूंची टंचाई आहे परंतु एकंदरीत दुकानातील कपाटे मालाने भरलेली आहेत.

याचे कारण म्हणजे आज स्मिथ पूर्वीपेक्षाही जास्त बलवान बनलेला आहे. सर्व गोरी जनता त्याचे मागे उभी आहे. विरोधी पक्ष आजही बेकायदेशीर नसले तरी राजकीय क्षेत्रात स्मिथला विरोधक नाहीत. बळजबरीने स्वातंत्र्य मिळविण्यास विरोध करणाऱ्या ऱ्होडेशियन न्यायालयानेसुद्धा आज स्मिथ सरकारला मान्यता दिली आहे.

आर्थिक टाळेबंदीचा निरुपयोग विल्सनलाही दिसत आहे. परंतु तो दुसरे काहीच करू शकत नाही. लष्कराचा उपयोग करणे म्हणजे ब्रिटनमध्ये मजूर पक्षाने आत्महत्या करण्यासारखे होणार आहे. आपल्या टाळेबंदीतील कमजोर दुवे बंद करावयाचे असल्यास दक्षिण आफ्रिकेविरुद्ध पण टाळेबंदी करावी लागेल. पण दक्षिण आफ्रिकेतील सोने घसरणाऱ्या पौंडाला सावरण्यास मदत करीत आहे. अशा परिस्थितीत ऱ्होडेशियाबद्दलच्या धोरणात यश मिळविण्याची विल्सनची धडपड आहे. कारण ब्रिटनने राष्ट्रकुलातील राष्ट्रांना आपले उद्देश शुद्ध आहेत हे सिद्ध करून दाखवले तरच राष्ट्रकुल फुटणार नाही.

— टाइम, १६ सप्टेंबर १९६६.

---

❀ मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

❀ या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

❀ मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.



अनुक्रमणिका

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ६३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | | २३०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) ... | | ५·०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६·०० |
| (१०) नवमानवतावाद ... ... ... | | २·५० |
| (११) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३·०० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | ३.०० |
| (१३) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | | २.५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... | २·०० |